# प्रीतीचा खेळ

स्वतंत्र सामाजिक कादंबरी

लेखक

दत्ता वैद्य

किंमत तीन रुपये

एकमेव विक्रेते

बॉम्बे बुक डेपो, गिरगांव-मुंबई ४.

# सुरवातीचे शब्द

'मोगरीचा गजरा' व 'हिरवळींतील कांटे' हे माझे कथासंग्रह प्रसिद्ध होऊन दीर्घकाल लोटल्यानंतर, आज 'प्रीतीचा खेळ' ही माझी पहिली कादंबरी प्रकाशित होत आहे. 'हिरवळींतील कांटे' व 'प्रीतीचा खेळ' ह्या दोन पुस्तकांमध्ये बराचसा अवधि लोटायला कारणहि तसेंच झालें मध्यमवर्गीय पांढरपेशांच्या पाचवीला पुजलेल्या उपजीविकेचा दुबळा मार्ग सोडून, चित्रपट-व्यवसायासारख्या अगदी वेगळ्या स्वरुपाच्या धंद्यांत शिरण्याचें धाडस—नव्हे साहस मीं केलें. तेथे दिग्दर्शन—क्षेत्रांत पाऊल टाकून, चित्रपट-दिग्दर्शनाचें तंत्र व मंत्र सूक्ष्म रीतीने अभ्यासायला मी सुरवात केली. माझ्यामध्ये वसत असलेल्या लेखनकलेला चित्रपट-दिग्दर्शनाच्या व्यवसायांत पुष्कळ वाव मिळेल, ह्या जाणीवेने मला साहजिकच मोठा उत्साह वाटला. परंतु ह्या क्षेत्रांत वावरायला लागल्यानंतर, मला लेखनासाठी जवळजवळ वेळच मिळेनासा झाला. शिवाय ज्यांच्यापाशी दिग्दर्शनाचे धडे घ्यायला मी सुरवात केली, ते माझे चित्रपट-व्यवसायांतील गुरु आणि भारताचे ज्येष्ठ व श्रेष्ठ दिग्दर्शक श्री. व्ही. शान्ताराम ह्यांनी मला आपुलकीने परंतु सक्त ताकीद दिली होती की, "वैद्य तुम्हांला दिग्दर्शनाची कला पूर्णपणे आत्मसात् करायची असेल, तर तुमचं लेखन कांही दिवस बाजूला ठेवा. चांगले दिग्दर्शक व्हा अन् मग पुन्हा लेखणी हातांत घ्या. एकाच वेळीं दोन्ही कलांकडे तुम्हांला लक्ष पुरवतां येणार नाही." श्री. शान्तारामबापूंच्या इशाऱ्याप्रमाणे लेखन बाजूला सारून, दिग्दर्शनाच्या अभ्यासाला मी स्वतः हिरीरीने वाहून घेतलें. आठ वर्षांच्या खडतर तपश्चर्येनंतर, आज त्या कलेवर थोडेंफार प्रभुत्व मला मिळवितां आलें आहे. दिग्दर्शन—कलेचें तंत्र, मंत्र व मर्म साकल्याने आत्मसात् केल्यानंतर आज माझ्या गुरूंनी लेखनाकडे वळण्याची मला परवानगी दिली आहे.

चित्रपट-व्यवसायांत शिरण्यापूर्वी मी सगळ्या लघुकथाच लिहिल्या व त्यांचे संग्रह प्रसिद्ध झाले. पण चित्रपटांतील पटकथे (Scenario)च्या विस्तृत व सूक्ष्म अभ्यासानंतर, लघुकथेपेक्षां जास्त व्यापक स्वरूपाच्या लेखनप्रकाराकडे वळायचें मीं ठरविलें; आणि त्याप्रमाणे ही 'प्रीतीचा खेळ' कादंबरी लिहीली.

माझ्या लेखनामध्ये दीर्घकाल खंड पडण्याचें कारण हें असें आहे.

ही कादंबरी प्रकाशांत आणण्यासाठी अनेकांनी मला साहाय्य केलें. माझ्या एका निकटवर्ती व्यक्तीने तर मला अतिशय मदत केली. त्या मदतीला मोलच नाही. पण त्याबद्दल तिचे आभार मानण्याचा प्रमाद माझ्या हातून घडणार नाही. आपल्या माणसाच्या ऋणांत राहण्यांतच एक-प्रकारचें सुख असतें आणि तें गमावण्याची माझी तयारी नाही.

चित्रपट–व्यवसायांतील माझे एक विश्वासू व जिव्हाळ्याचे मार्गदर्शक आणि विख्यात दिग्दर्शक श्री. कुमारसेन समर्थ ह्यांनीदेखील मला बहुमोल स्वरूपाची मदत केली. त्याबद्दल मी त्यांचा सदैव ऋणीच राहीन.

'संगम प्रेस'चे कुशल व प्रेमळ व्यवस्थापक श्री. पद्माकरपंत पटवर्धन व त्यांचे कनिष्ठ बंधु श्री. माधवराव पटवर्धन ह्या दोघांनी मला सर्व तऱ्हेची व अतिशय महत्त्वाची अशी मदत केली. त्याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों.

मुखपृष्ठ सजविण्यासाठी राजकमल कलामंदिर ह्या संस्थेने मला बहुमोल साहाय्य केलें. त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

चित्रपट–सृष्टींत पाऊल टाकल्यानंतर, श्री. व्ही. शान्ताराम ह्यांच्यापाशी मी दिग्दर्शन–कलेचें अथपासून इतिपर्यंतचे धडे घेतले. दिग्दर्शनांतील खांचाखोंचा शिकवून, त्या कलेचें सूक्ष्म व संपूर्ण ज्ञान त्यांनीं मोठ्या आस्थेने व जिव्हाळ्याने मला दिलें. त्यांच्या अगदी निकट जाऊन, त्या अवघड व मौलिक कलेचें मर्म जाणण्याची संधि मला मिळाली. त्यांच्या-जवळ हें शिक्षण घेत असतां व नंतर त्यांच्या हाताखालीं काम करतांना इतरहि हरतऱ्हेची मदत करून त्यांनी मला उपकृत केलें आहे. आपल्या हिन्दु संस्कृतीमध्ये पित्याच्या खालोखाल गुरूचें ऋण मानलें जातें. त्या ऋणाची अल्पशी फेड म्हणून हा "प्रीतीचा खळ" गुरुवर्य श्री. शान्तारामबापू ह्यांना मी अर्पण करीत आहें.

१६२ सी, हिन्दु कॉलनी,
४, राजाराम प्रसाद,
दादर–मुंबई १४

दत्ता वैद्य.

दि. ४–७–१९५२.



गुरूवर्य श्री. व्ही. शान्ताराम

   

माझे

चित्रपट-व्यवसायांतील गुरु

आणि

भारताचे ज्येष्ठ व श्रेष्ठ दिग्दर्शक

**श्री. व्ही. शान्ताराम**

ह्यांना

**अर्पण**

दत्ता वैद्य

   

# १

अशोक पायरस्त्यावर उभा होता. ठाकुरद्वारवरील प्राथमिक मराठी शाळेसमोरच्या पायरस्त्यावर तो दीनवाणेपणाने घोटाळत होता. साधा पायजमा, मळलेला लांब सदरा, आणि त्यावर किरमिजी रंगाचें जुनें जाकीट पेहरून तो रस्त्याच्या कडेला सारख्या येरझारा घालीत होता. त्याने केस कसे तरी मागे फिरविले होते. डोळ्यांत निराशा होती, – दुःख होतें. रुंद कपाळ भकास वाटत होतें. निमगोरे गाल खोल गेले होते. त्यामुळे मूळचा देखणा असलेला त्याचा चेहरा उदासवाणा,– सुकलेला दिसत होता शुभ्र – ठळक रांगोळी वाऱ्याच्या झोताने भुरभुरून पुसट – फिकी व्हावी,—तसा त्याचा चेहरा फिका – मलूल झाला होता. त्याच्या हालचालीवरून तो कमालीचा

अस्वस्थ असलेला दिसला. तो पायरस्त्यावर रेंगाळे, मध्येच थांबे, दूरवर दृष्टि टाकी, किलकिल्या नजरेने समोरच्या शाळेमध्ये पाही,— आणि त्याचा जीव की प्राण असलेला मधु त्याला दिसला नाही की मग हताश होई ! किती तरी वेळ त्याचा हा क्रम चालला होता. शेवटीं, हमरस्ता ओलांडून शाळेला लागून असलेल्या पायरस्त्यावर तो आला. तेथून कुंपणाच्या भिंतीचा आधार घेऊन मान उंचावून त्याने पाहिलें. परंतु आतादेखील त्याच्या पदरीं निराशाच आली. तेव्हा तो शाळेच्या आवारांत गेला. बहरलेल्या बगीचांत प्रवेश करून तो मेंदीच्या झाडांपाशी आला. मेंदीच्या झाडावर रेलून त्याने वर उडी मारली—आणि पहिलीच्या वर्गांत डोकावलें. परंतु त्याचा आवडता मुलगा मधु-बाळ तेथे त्याच्या दृष्टीला पडला नाही. अशोक घाबरला, बाव-रला. त्याची बावरी नजर निरनिराळ्या वर्गांतून मधूला शोधूं लागली, पण व्यर्थ ! तो सापडला नाही. अशोकची अतिशय निराशा झाली. आता त्याची जास्तच धांदल उडाली. त्याने पुन: एकदा प्रयत्न करायचें ठरवलें. टांचा उंच केल्या. मान वर केली. त्याची गांगरलेली दृष्टि मुलाला भिरभिरी शोधूं लागली.

पहिलीच्या वर्गाला शिकवीत असलेल्या गुलाबबाई, —अशो-कचे हे सारे चाळे फळ्यापाशी उभ्या राहून मघांपासून पाहात होत्या. प्रथम रस्त्यापलीकडच्या पायरस्त्यावर उभा राहून तो टेहळणी करीत होता,—तेव्हा त्यांना विशेष वाटलें नाही. तो अलीकडच्या पायरस्त्यावर आला — तरी त्यांनी मनावर घेतलें नाही; पण जेव्हा तो बागेंत येऊन मेंदीच्या वनांत शिरला—आणि उड्या मारून वर्गांत पाहूं लागला, तेव्हा

मात्र त्यांचें मस्तक तापलें. आपल्यावर निर्लज्जपणे टेहळणी करणाऱ्या त्या माणसाचा गुलाबबाईंना भारी संताप आला. लाल-बुंद होऊन त्या बाहेर सोप्यांत आल्या. त्यांच्या नाजुक ओठांतून आग बाहेर पडूं लागली,—

" मांग मेला ! लाज वाटत नाही असं जागोजाग उभं राहायला—अन् उड्या मारायला ?—"

" अहो पण—" अशोकने बोलण्याचा प्रयत्न केला.

—पण त्याला धुडकावून गुलाबबाई गर्जू लागल्या,

" अहो पण—! वर निलाजऱ्यासारखं तोंड उघडायला शरम वाटत नाही ? "

मास्तरीणबाईंचा गैरसमज काढण्याचा प्रयत्न अशोक करूं लागला, पण गुलाबबाईंनी त्याला बोलायला अवसरच दिला नाही. त्यांनी स्वतःचीच सरबत्ती चालू ठेवली. तेव्हा अशोक कचरला, गांगरला. झपाट्याने त्याने आपला पाय तेथून काढता घेतला.

दुसऱ्या दिवशीं शनिवार म्हणून सकाळची शाळा होती. शाळा भरल्यानंतर अर्ध्या तासाने अशोक मधूला पोहोचविण्या-साठीं शाळेपर्यंत आला. बाळगोपाळांच्या मेळाव्यांत उभ्या अस-लेल्या गुलाबबाईंच्या नजरेंतून तो निसटला नाही. बाईंना काल घडलेला प्रसंग आठवला. त्या संतापल्या !

पुनः दहा वाजतां शाळा सुटण्याच्या वेळीं अशोक आपल्या मुलाला घरीं न्यायला आला. वर्गांत टेबलापाशी उभ्या राहून समोर बसलेल्या मुलामुलींना गुलाबबाई परवचा सांगत होत्या.

अकस्मात् त्यांचें लक्ष अशोककडे गेलें. त्यांना मनस्वी राग आला. त्यांच्या गोऱ्या नाकाचा शेंडा लाल झाला. कानशिलें गरम झालीं. त्या तडक दरवाजाकडे निघाल्या. तावातावाने हेडमास्तरीणबाईंच्या कचेरींत गेल्या. काल झालेला आणि आज सकाळचा सारा प्रकार त्यांनी हेडबाईंना सांगितला. जवळच उभ्या असलेल्या शाळेच्या मोलकरणीला हाक मारून त्या म्हणाल्या,

"रंगूबाई, चल माझ्याबरोबर. चांगला पायांतल्या वहाणे-खाली ठेच मांगाला! ताळतंत्रच राहिला नाही मेल्याला!"

पालीसारख्या सरसर त्या बागेंत आल्या. फाटकापाशी गेल्या. घारीच्या नजरेने त्यांनी चहुंकडे पाहिलें.

पण अशोक आपल्या लाडक्या मधुबाळाला घेऊन केव्हाच घराकडे परतला होता.

गुलाबबाई व रंगू हात चोळीत आणि पाय आपटीत आपा-पल्या कामाला निघून गेल्या.

नंतर पुष्कळ दिवस असे प्रकार घडले. किती तरी वेळां अशा प्रकारचे प्रसंग आले आणि गेले, परंतु प्रत्येक वेळीं कांही ना कांही कारणाने समोरासमोरी झाली नाही.

—त्या दिवशीं मात्र अगदी कळस झाला!

अशोक नेहमीप्रमाणे मधुबाळाला नेण्यासाठी शाळेपाशी आला. स्वत:च्या लाजऱ्या स्वभावानुसार प्रथम तो पलीकडच्या पायरस्त्यावर उभा राहिला. बराच वेळ वाट पाहिल्यानंतर रस्ता ओलांडून तो शाळेच्या फाटकामध्ये आला. शाळा

सुटलेली होती. घरीं जाणाऱ्या लहान मुलांमुलींची खूप धांदल उडाली होती. त्या बालकांच्या गर्दींतून वाट काढीत अशोक बागेंत गेला. बापाच्या नजरेने सगळीकडे धुंडाळलें, परंतु मधुबाळ कुठे दिसेना. अशोकला काळजी वाटूं लागली. तो पहिलीच्या वर्गाच्या खिडकीपाशी वेगाने गेला, आणि मान उंचावून आंत डोकावूं लागला. गुलाबबाईंच्या बारिक नजरें-तून अशोकची ही हालचाल सुटली नाही. अगदी खिडकीपाशी येऊन अशोकला राजरोस टेहळणी करतांना पाहून त्या भयंकर भडकल्या. संतापाने त्या लाल झाल्या. रागाच्या भरांत तशाच बाहेर आल्या,—आणि अशोकला अद्वातद्वा बोलूं लागल्या.—

"आज अगदी तुम्हीं कळस केलात !........जनाची नाही तरी निदान मनाची लाज बाळगायची होतीत !—थांबा, तुम्हांला पोलिसाच्या स्वाधीन करायला पाहिजे ! तुमच्यासारखे गुन्हेगार —"

"गुन्हेगार ? – काय असा मीं तुमचा गुन्हा केला आहे ? स्वत:च्या —"

इतक्यांत मुलांच्या घोळक्यांतून मधुबाळ धावत आला. जवळ जाऊन त्याने अशोकच्या कमरेला कडकडून मिठी मारली. अशोकने पटकन् त्याला उचलून घेतलें त्याच्या काळ्याभोर केसांवरून हात फिरविला. त्याचा गोंडस चेहरा कुरवाळला त्याच्या मऊ, गुबगुबीत गालांचा पापा घेतला. अशोकच्या डोळ्यांत पाणी तरारलें. मधूला कडेवर घेऊन तो झटकन् वळला आणि चालूं लागला.

... १४ ...

गुलाबबाई—ती संशयी, जहांबाज त्राटिका—आश्चर्यचकित होऊन, अशोकच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहातच राहिल्या. स्वतःच्या डोळ्यांवर त्यांचा विश्वासच बसेना. त्या अगदी दिङ्मूढ झाल्या ! कावऱ्याबावऱ्या आवाजांत त्या रंगूला कांहीं बोलणार, इतक्यांत तिनेच त्यांना म्हटलें,

" लई गोड पोरगं हाय, न्हाई – मदु ! कसं गोटीवानी दिसतंया ! "

" कोण ? " तिने असावधपणे विचारलें. कारण तिच्या मनांत आता मधूपेक्षा त्याच्या गूढ बापाने गोंधळ उडवून दिला होता !

" अवो ऽऽऽ — त्यो बामनाचा मदु व्हो ! "

" खरंच ! " गुलाबबाई स्वतःच्याच नादांत विमनस्कपणे उद्गारल्या.

ती सगळी संध्याकाळ त्यांनी ह्या घडलेल्या विचित्र घटनेचा विचार करण्यांत घालविली.

रात्रीं बिछान्यावर पडल्यावर, मधूपेक्षा त्याचे वडीलच तिच्या मिटलेल्या डोळ्यांपुढे आले. करुण, गहिरी नजर असलेला, देखण्या चेहऱ्याचा – परंतु नेहमी उदास दिसणारा अशोक, स्वप्नामध्येदेखील शाळेतील मेंदीच्या वनामध्ये उभा राहून त्यांची टेहळणी करूं लागला.

* * *

# २

दुसऱ्या दिवशीं अकरा वाजतां शाळा भरली. रात्रीच्या अस्वस्थ झोपेमुळे व जागरणामुळे गुलाबबाईंना शाळेंत यायला थोडासा उशीर झाला. जराशा धांदलींतच त्यांनी वर्गांत पाऊल ठेवलें. मुलांनी वर्ग डोक्यावर घेतला होता ! त्यांचा गोंगाट शान्त केल्यानंतर, पहिल्याप्रथम बाईंनी मधु आला का नाही ह्याची चौकशी केली. तो अजून आलेला नव्हता. त्यांची थोडीशी निराशा झाली. इतका वेळ उत्साही दिसणारा त्यांचा उमदा चेहरा एकदम हिरमुसला. पण लगेच, संधिप्रकाशांत वीज चमकावी – तशी त्यांच्या हिरमुसल्या मुखावर आनंदाची तिरीप झळकून गेली. त्यांच्या हळुवार मनाला सहज विचार चाटून गेला —' आता मधूला पोहोंचवायला त्याचे वडील —पण

वडीलच का ? त्याचे काका कशावरून नसतील ? कोणीहि असोत,–पालक तर खरे.— ते त्याच्याबरोबर येतील; आणि मग आपण त्यांच्यापाशीं कालच्या अनिष्ट प्रकाराबद्दल दिलगिरी प्रदर्शित करूं ! '

वर्गांतील मुलांमुलींना बाराखड्या काढायला सांगून त्या खिडकींत आल्या, आणि बाहेर टेहळूं लागल्या. फाटकांत, बागेंत, मेंदीच्या बनांत—सगळीकडे त्यांनीं आपली चौकस दृष्टि फिरविली. काय गंमत पहा,–आजपर्यंत त्यांच्यावर निर्लज्जपणे टेहळणी करणाऱ्या ' मांगा 'ला त्या स्वत: आज शालीनतेने टेहळत होत्या.

जरासा वेळ गेल्यावर, गळ्यांत दप्तर अडकवून मधु फाटकांतून ऐटींत येतांना गुलाबबाईंना दिसला. त्याला एकटाच पाहून त्यांची निराशा झाली. त्या लगबगीने दाराशीं गेल्या. सहजपणाचा आविर्भाव आणून घाईघाईने त्यांनीं मधूला विचारलें,

" एकटाच आलास आज, मधु ? "

" नाही कांही ! माझ्या बाबांच्याबरोबर आलों ! त्यांनीं मला फाटकापर्यंत सोडलं. मग पुढं मी एकटा आलों. हुषार आहे ना मी, बाई ? "

" तर तर ! आमचा मधु फार हुषार आहे ! " बाईंनीं पटकन् मधूचा मुका घेतला. आजूबाजूला एकदा पाहून त्यांनीं हळूच त्याला विचारलें, " पण काय रे मधु, काल संध्याकाळीं तुला न्यायला आले होते, ते कोण रे तुझे ? "

" ते बाबाच होते माझे." गळ्यांतून दप्तर काढीत तो अभिमानाने सांगूं लागला, " फार चांगले आहेत – बरं का ते ! मी रस्ता चुकेन म्हणून दररोज मला शाळेंत आणून घालतात,– आणि न्यायला येतात. लहान आहें ना मी !–अगदी खूप मागं माझी आई येत होती. पण आजारी पडून ती देवाच्या घरीं गेली. तेव्हा आता बाबाच येतात माझ्याबरोबर. माझी आई देवाच्या घरून परत आली की मग ती येईल. किनई, बाई, माझे बाबा म्हणत होते की, आई लवकरच येणार आहे. देवाचं पत्र आलंय ! मला दाखवलं त्यांनी ! "

गुलाबबाईंच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला !

मधूचे भाबडे बोल ऐकून त्यांना स्वतःच्या संशयी मनाची शरम वाटली. त्या फार शरमिंद्या झाल्या.

अशोकच्या खोल गेलेल्या डोळ्यांतील करपलेली – करुण नजर, त्याचा विमनस्क – भकास चेहरा, त्याच्या अशान्त मुखावरील बावरलेले भाव, आणि त्याच्या डोळ्यांतील अश्रु – ह्यांचा अन्वयार्थ हळूहळू गुलाबबाईंच्या ध्यानांत येऊं लागला. त्या स्वतःशीच कुजबुजल्या,

' पत्नीच्या अकाली निधनानं ते दुःखी झालेले आहेत ! करुण घटनेनं त्यांचं कोवळं मन जायबंदी झालं आहे ! त्यांचं हळवं हृदय जखमी होऊन वहात आहे ! ...... आणि त्या वहात्या जखमेवर काल केवढा जबरदस्त तडाखा हाणला मीं ! कसा निष्ठुरपणा झाला माझ्या हातून ! किती चांडाळीण आहे मी ! '.

गुलाबबाईंची अशोककडे पाहण्याची आजपर्यंतची दृष्टि एकदम बदलली. त्यांची कलुषित नजर अजिबात निवळली.

पूर्वी बाईंना अशोकविषयी तिरस्कार वाटायचा. आता तिटकाऱ्याची जागा सहानुभूतीने घेतली संतापाच्या ठिकाणीं शालीनता आली. चीड जाऊन ममता दिसूं लागली. घृणा गेली आणि आपुलकी आली. परकेपणा नष्ट होऊन जिव्हाळा निर्माण झाला !

आता गुलाबबाई शाळेंत आल्या की समोरच्या पायरस्त्यावर किंवा फाटकामध्यें सारख्या पाहूं लागल्या. खुर्चीपासून खिडकी-पर्यंतच्या त्यांच्या येरझारा वाढल्या. मैदानांत, बागेंत, मेंदीच्या बनांत अशोकला धुंडाळण्यासाठी त्यांची अपराधी नजर गरगर फिरूं लागली.

अशोक नेहमीप्रमाणे मधूला आणून घालायला आणि न्यायला नियमाने न चुकतां यायचा. गुलाबबाई त्याच्या दृष्टीस न पडतां, आड बाजूला उभ्या राहून त्याला बारकाईने न्याहाळीत असत. त्यांना आपल्या गत वर्तनाबद्दल फार शरम वाटत होती.

अलीकडे अशोक शाळेंत आला म्हणजे बाई खिडकीच्या फटींतून, खिडकीवाटे, किंवा कधी कधी दारांत उभ्या राहून त्याच्याकडे निरखून पाहूं लागल्या. मागे त्याच्याकडे पाहण्याची त्यांची दृष्टि निराळी होती. आज ती अजिबात बदलली होती.

त्याचे करुण डोळे, लाजरा चेहरा, आणि त्याच्या वर्तनांतील बुजरी घृत्ति बघून त्यांचें हळवार मन अतिशय द्रवायचें.

अशोकच्या उंच कपाळावर खट्याळपणे वावरणारी केसांची एकच एक बट पाहून, गुलाबबाईंना त्याच्या एकाकीपणाची

तीव्रतेने जाणीव होई. त्याच्या अंत:करणांत, मुखावर, किंवा त्याच्या प्रत्येक बारीकसारीक हालचालींत प्रकर्षाने दृग्गोचर होणारें एकटेपणाचें दु:ख पाहिलें की बाईंना अतिशय वाईट वाटे.

मधूबरोबर अशोक दररोज शाळेंत येतच असे. शाळेच्या परिसरांत तो वारंवार गुलाबबाईंना दिसूं लागला. दिवसांतून दोनदा न चुकतां नियमाने बाईंना त्याचें दर्शन होऊं लागलें. नेहमीच्या पाहण्याने त्याच्या स्वभावांतील निरनिराळे व नवीन नवीन पैलू, आणि त्याच्या वर्तनांतील व हालचालींमधील बारीक सारीक वैशिष्ट्यें त्यांच्या दृष्टोत्पत्तीस येऊं लागलीं. शरीराने गुलाबबाई अशोकपासून खूप दूर होत्या, परंतु मनाने त्या त्याच्या अगदी निकट गेल्या होत्या. त्यांचे विचार सदोदित त्याच्याभोवती वावरूं लागले. त्यांचा जीव त्याच्या आसपास घोटाळूं लागला. त्यांच्या मानी परंतु हळुवार मनाला अशोकची विलक्षण – गूढ ओढ वाटूं लागली. आजपर्यंतच्या आयुष्यांत कधीहि न अनुभवलेल्या गोड ऊर्मि त्यांच्या मनांत उसळल्या. त्यांच्या तरुण रक्तांतील कण न् कण अशोककडे ओढ घेऊं लागला. ती विचित्र ओढ — आणि तें गाढ आकर्षण त्यांना स्वस्थ बसूं देईना. त्या कमालीच्या अस्वस्थ झाल्या. तीच अस्वस्थता एक दिवस त्यांना असह्य झाली. त्यांना कांहीं सुचेना. त्या तडक खुर्चीवरून उठल्या. वर्गांतील मुलांना उजळणी काढायला सांगून त्या सरळ शाळेच्या कचेरींत गेल्या. पालकांची माहिती असलेल्या घडवंचीवरील सगळ्या फायली चाळून, गुलाबबाईंनी मधूच्या वडिलांची—अशोकची माहिती काढली.

अशोक पांढरपेशा वर्गातील चित्रकार आहेत, त्यांचें वय बत्तीस आहे, त्यांची आर्थिक स्थिति बेताचीच आहे—वगैरे विशेष परंतु तुटपुंजी माहिती तेथे त्यांना मिळाली.

तेवढ्याने त्यांचें समाधान झालें नाही.

पुढे एक दिवस कचेरीमध्ये हेडमास्तरीणबाईंशी गप्पा मारीत असतांना त्यांना अशोकविषयी खूपच हकीकत समजली. हेडमास्तरीणबाई सहज बोलतां बोलतां म्हणाल्या,

"अशोक महाजन हे आजच्या तरुण पिढींतील एक चांगल्यापैकी चित्रकार आहेत. घरच्या गरीबीमुळं लहानपणी त्यांना फार कष्ट काढावे लागले. परिस्थितीशी झगडून त्यांनी स्वत:चा विद्याभ्यास केला. वयांत आल्यावर तरुणपणी त्यांनी रक्ताचं पाणी केलं. घामाची आंघोळ केली. परंतु त्यांची आर्थिक परिस्थिति सुधारली नाहीं. आजदेखील केवळ दारिद्र्या-मुळं त्यांच्या कलेचं चीज होत नाहीं. ते जातिवंत कलावंत आहेत. परंतु पैशाचा आधार नसल्याकारणानं आज मागं पडलेत. दिवसभर पोटासाठी राबण्यापायीं स्वत:च्या ईश्वरदत्त कलेकडे लक्ष द्यायला त्यांना फुरसतच मिळत नाहीं. भाकरी-पायीं त्यांच्या कलेची अन् पर्यायानं त्यांच्या साऱ्या आयुष्याची नासाडी झाली आहे. दुसरंदेखील कुठलं सुख त्यांना लाभलं नाहीं. त्यांची बायको तीन वर्षं क्षयानं आजारी होती. नुकतीच वारली. आता मधु अन् ते. मुलाचं सगळं तेच करतात. दु:खांनी व संकटांनी बिचारे अगदी बावरून, गांगरून गेले आहेत."

हेडबाईंच्या तोंडून अशोकची सगळी माहिती ऐकल्यानंतर गुलाबबाईंना अतिशय वाईट वाटलें. आणि अशा सत्त्वशील

माणसाला अन् जातिवंत कलावंताला आपण वाटेल तसें टाकून बोललों,—त्याबद्दल त्यांची त्यांनाच खंत वाटली. स्वत:च्या हातून घडलेल्या घोडचुकीचा त्यांना मनस्वी संताप आला आपल्या मूर्खपणाची त्यांना शरम वाटली. त्या दिवशींच्या स्वत:-च्या अविचारी व बेजबाबदार वर्तनाच्या गंभीर परिणामांचा विचार मनांत आल्यानंतर गुलाबबाई स्वत:शीच अजाणतां उद्गारल्या, 'मीं नाहीं नाहीं तें बोललें त्यांना. 'मवाली–गुंड–गुन्हेगार – पोलीसच्या स्वाधीन करायला पाहिजे—वगैरे हलक्या दर्जाची भाषा वापरून आपण त्यांचा उपमर्द केला मानी पुरुषाचा आपण विनाकारण अपमान केला ! किती दु:ख झालं असेल त्याचं त्यांना ! माझ्या हातून अपराध घडला ! मीं त्यांचा गुन्हा केला !–मीच खरी गुन्हेगार आहे ! मला चांडाळणीला शिक्षा झाली पाहिजे !........तें कांही नाही ! मला अशोकांची क्षमा मागितली पाहिजे !—आजचे आज ! आत्ताचे आत्ता !'

नौकरीपेशामुळे धुंदलेली गुलाबबाईंच्यामधील खरीखुरी स्त्री आता जागी झाली. त्यांचें स्त्रीसुलभ मन अशोकची क्षमा मागण्या-साठी उतावीळ झालें. 'पण क्षमा कशी मागायची ? त्यांना कसं तोंड दाखवायचं ? कोणत्या तोंडानं अशोकांशीं बोलायचं ?' —बाई गहन विचारांत पडल्या. त्या जागच्या उठल्या. कचेरीं-तून निघाल्या, आणि तांतडीने आपल्या वर्गात आल्या. खुर्ची-वर बसल्यावर, समोरच्या मेजावर कोपर रोवून आणि हातांच्या तळव्यांवर स्वत:चे गाल आधारून, त्या किती तरी वेळ विचार करीत बसल्या होत्या. कसला तरी मनाशीं निश्चय केल्यानंतर त्यांनी वर पाहिलें. मधूला पाटी घेऊन टेबलाजवळ बोलावलें.

तो विजार सावरीत आला. पाटी टेबलावर ठेवून बाईंकडे तो लाडिकपणे पाहूं लागला. त्याच्या हातांतील दुधी पेन्सिल घेऊन बाईंनी पाटीवर लिहायला सुरवात केली,

" मधूचे बाबा,

त्या दिवशीं गैरसमज होऊन, माझ्या हातून तुमचा अपमान झाला. मी अपराधी आहे. मला क्षमा करावी.

मधूच्या
बाई."

मधूच्या हातांत पाटी देत त्या त्याला प्रेमळ आवाजांत म्हणाल्या,

" बरं का बाळ, घरी गेल्यानंतर ही पाटी तुझ्या बाबांना दाखव. दुसरं कोणाला वाचूं देऊं नकोस. विसरायचं नाही हं. मग उद्या मी तुला खाऊ देईन, बरं का ! "

गुलाबबाईंनी त्याच्या पाठीवर हात फिरवला. त्यांना आता खूप हायसें वाटूं लागलें.

त्या अशोककडून उत्तराची अपेक्षा करीत होत्या.

दुसऱ्या दिवशीं अकरा वाजतां आल्याबरोबर त्यांनी घाई-घाईने मधूची पाटी उलटीसुलटी करून पाहिली.

पाटी कोरी होती !

बाईंची निराशा झाली ! क्षणांत त्यांचा गोरापान चेहरा काळवंडला ! हताश होऊन त्या विचारांच्या भोवऱ्यांत साप-डल्या. भोवऱ्याच्या आरीची तीक्ष्ण धार त्यांच्या नाजुक हृदयाला

टोचली. तें कळवळलें. परंतु जखम निराळी ईर्षा निर्माण करते. गुलाबबाईंचेंहि तसेंच झालें. त्यांच्या टोंचलेल्या अंत:करणाने जोराची उसळी घेतली. त्यांचें हळुवार मन खडबडून उठलें.— बंड करण्यासाठी तयार झालें !

'बंड ?

होय, बंडच !

त्यांनी किती अगत्यपूर्वक व जिव्हाळ्याने अशोकला काल पाटीवर लिहिलें होतें. पण त्याने त्याची दखलहि घेतली नव्हती. साहजिकच त्यांचा अभिमान दुखावला. जखमी अभिमानाने त्यांना बंडाला प्रवृत्त केलें.

संध्याकाळीं शाळा सुटतांना पुन: गुलाबबाईंनी मधूच्या पाटीवर लिहिलें,—

" **मधूचे बाबा,**

कालची माझी विनंति तुम्हीं वाचलीत, पण ओळभर उत्तर लिहिलं नाही. जखमी अभिमानाच्या वेदना काय असतात ह्याची आज मला चांगली कल्पना आली. –त्या दिवशीं अजाणतां का होईना,–पण मी तुमच्या मानी मनाला जबरदस्त जखम केली होती. आज तुम्हीं त्याची परतफेड केलीत. माझं हुरहुरणारं हृदय जायबंदी केलंत. एकहि शब्द न बोलतां किंवा लिहितां घाव घालण्याची तुमची पद्धत कांहीं न्यारीच !— माझ्या त्या जहरी बोलांपेक्षा तुमचं हें अबोलपण जास्त भयंकर आहे. पण आता फिटंफाट झाली ! दोघंहि जखमी झालों आहोंत. दोन जखमी डहाळ्या एकत्र आल्या की नवीन सुंदर

कलम निर्माण होतं — असं वनस्पतिशास्त्रज्ञ म्हणतात. दोन जखमा जवळ जवळ आल्या म्हणजे माणसांमध्ये कांही उदात्त, रम्य निर्मिति कां होऊं नये ?

उत्तर लिहा, अपेक्षा करतें.

मधूच्या
गुलाबबाई."

अशोकच्या अबोल राहण्याने गुलाबबाईंचें आकांक्षी मन खरोखरीच दुखावलें होतें. आजपर्यंत जखम आणि हृदय हे शब्द त्यांच्या परिचयाचे नव्हते. आता त्या दोन्हीहि शब्दांचा अर्थ त्यांना चांगला समजलेला होता. एवढेंच नव्हे, पण ते दोन शब्द एकत्र आले तर केवढें दु:ख व व्याकुळता निर्माण होते ह्याचा प्रत्यक्ष अनुभव आज त्यांना आला होता.—नाही तरी ह्यापूर्वी असा मनोभंगाचा अथवा निराशेचा अनुभव गुलाबबाई-सारख्या तरुण स्त्रीला कसा येणार ? त्यांचें आतापर्यंतचें सारें जीवनच बंदिस्त आणि रेलचेलीने व्यापलेलें होतें.

सर गोपीनाथ शहाणे ह्या जुन्या जमान्यांतील सेवानिवृत्त आय् सी. एस्. अधिकाऱ्याची लाडकी कन्यका होण्याचा मान त्यांना लाभला होता. सर्व गोष्टींनी समृद्ध असलेल्या घरांत गुलाबचें एम् ए. पर्यंतचें शिक्षण हसतखेळत झालें होतें. एम् ए. पदवी घेतल्यानंतर सर गोपीनाथ तिला म्हणाले होते, 'बाळ, पीएच्. डी. होण्यासाठी तुला लंडनला जायचं असेल तर जा.' त्यावर गुलाब लगेच उत्तरली होती, 'काका, पुरे झालं शिक्षण. कंटाळा आला त्याचा. आजच्या शिक्षणानं विचारांवर संस्कार होत असतील, पण मनाला समाधान नाहीं लाभत.' त्यावर

सरसाहेब बोलले होते, ‘ ठीक आहे. मग सुंदरसा मुलगा पाहून लग्न उरकून टाकूं या.’ पण गुलाबला वडिलांचा हा विचार रुचला नाही. मौन धारण करून तिने आपली नापसंती दर्शविली. इतकी शिकलेली—परंतु आजकालच्या फॅशनने तिलाहि झपाटलें होतें. श्रीमंतांच्या सुखवस्तु मुलींनी पन्नास रुपये पगार व पंचवीस रुपये महागाई भत्त्याची नौकरी करण्याचें विचित्र खूळ अलीकडे शहरामधून सुरू झालें होतें. गुलाबलाहि त्याची बाधा झाल्यावांचून राहिली नाही. वस्तुतः तिच्यासारखीला नौकरी करण्याची काय जरूरी होती ? वडिलांची टोलेजंग इमारत मुंबईत होती. घाटावर शेकडो एकर शेतीवाडी पसरली होती. बँकेंत रोकड असून, घरांत दागदागिन्यांची व कपड्यालत्त्यांची खैरात होती. वडिलांना दरमहा दीड हजार रुपये पेन्शन मिळत होतें. आणि तरीहि गुलाबला लग्न डावलून, पंचाहत्तर रुपयांची नौकरी करायची होती. तिचा हा मानस पाहून सर साहेबांना संताप आला होता. तरी सौम्य आवाजांत ते तिला म्हणाले होते, ‘ मुली, सगळी सुबत्ता असतांना तुझ्यासारखीनं नौकरी करणं म्हणजे मूर्खपणा आहे ! तें एक ढोंग आहे !— ही फॅशन दुष्ट आहे. कारण त्यामुळं गरजू माणसाची संधि हिरावून घेतली जाते. तो हकनाक बेकार राहतो. त्याच्यावर विनाकारण उपासमारीची वेळ येते.’ वडिलांचे हे जळजळीत उद्गार ऐकून गुलाब क्षणमात्र निरुत्तर झाली होती. पण नंतर तिने रदबदली केली होती, ‘ पण काका, लोकसेवा करण्यासाठीं—’

'पोरी, स्वतःच्या व माझ्या डोळ्यांत धूळ फेकूं नकोस!—तुला सेवाच करायची असेल तर एखाद्या विधवाश्रमांत जाऊन फुकट काम कर! तिथं दुःखितांचीं दुःखं उपस! म्हणजे तुझ्या मनाला समाधान मिळेल.' वडिलांचा आवाज चढलेला ऐकून ती गप्प राहिली. पण तिने आपला हेका मात्र सोडला नाही.

लहानपणीं, किंवा वयांत आल्यावर तरुणपणीं चुकीचीं माणसें सहवासांत आलीं, तर एखाद्याच्या आयुष्याला चुकीचें व परिणामीं घातुक वळण लागतें. गुलाबचें तसेंच झालें होतें. उथळ मैत्रिणींच्या नादीं लागून तिने मॉंटेसरी बाईचा स्पेशल कोर्स पुरा केला होता, आणि ठाकुरद्वारच्या प्राथमिक शाळेंत शिक्षिकेची नौकरी धरली होती.

गुलाब गुलाबबाई झाल्या होत्या.

शिक्षिकेच्या सरळ व साध्या व्यवसायांत गुलाबबाईसारख्या सधन तरुणीवर निराशेची वेळ कशाला येईल? शिक्षणाचा रुक्ष व धोपटमार्गी पेशा पत्करल्यामुळे त्यांना मनोभंगाचा प्रसंगच कधी आला नव्हता.

—तेव्हा साहजिकच निराशेचा पहिला तडाखा बसल्यावर त्यांना कमालीचें दुःख झालें होतें. अशोकने केलेल्या मनोभंगाने त्यांच्या कोवळ्या हृदयाला आयुष्यांत प्रथमच जबर यातना झाल्या होत्या.

ती रात्र त्यांनी मोठ्या कष्टाने काढली.

दुसऱ्या दिवशी अधीर मनाने त्या शाळेंत आल्या. भीत भीत त्यांनी मधूची पाटी पाहिली. तीवर लिहिलें होतें,

" मधूच्या बाई,

स्वत:च्या उद्धटपणाचा आपल्याला पश्चात्ताप झाला. वाइटानं भरलेल्या ह्या जगांत चांगुलपणाचं असं क्वचित् दर्शन झालं म्हणजे मनाला बर वाटतं !

मधूचे
बाबा."

पाटी पटकन् छातीशी धरून गुलाबबाईंनी क्षणभर डोळे मिटले. रात्रभर डोक्यावर वाहिलेल्या ओझ्याचा भार हलका झाल्यासारखें त्यांना वाटलें. अशोकने आपल्याला उत्तर लिहिलें, ह्या एकाच विचाराने त्यांना अतिशय आनंद झाला.

* * *

# ३

मधूपेक्षा गुलाबबाईच त्याच्या पाटीचा जास्त व वारंवार उपयोग करूं लागल्या. मग अशोकलाहि भिडेखातर त्यांची साथ करणें भाग पडे.

अलीकडे त्या दोघांची ही पाटीवरील निरोपानिरोपी पुष्कळच वाढली होती. गुलाबबाईंनी मोठ्या मुत्सद्देगिरीने परंतु नाजुक-पणे ह्या पाटीवरील निरोपांकरवीं अशोकशी ओळख वाढवली होती. प्रत्यक्ष न भेटतांदेखील त्या दोघांचा चांगला परिचय झाला होता.

अशोक दु:खी असल्यामुळे अबोल होता. भोवतालच्या कठीण परिस्थितीने गंभीर बनलेल्या त्याच्या स्वभावांत मोकळे-

पणा जवळजवळ नव्हताच. त्यामुळे उत्सुक असलेल्या गुलाबबाईंची कधीकधी निराशा होई. मग मधल्या सुटींत मधूला प्रेमाने जवळ घेऊन त्या त्याच्याकडून अशोकविषयी माहिती काढीत,—आणि स्वतःच्या उत्कंठित मनाचें समाधान करीत. त्या स्वतः अशोकला पाटीवर चिठ्या लिहीत, त्यांत मात्र त्यांच्या मनाचा मोकळेपणा स्पष्ट दिसे. नाहीं तरी आजकाल मधूच्या बाईंना स्वतःच्या स्वभावांतील मोकळी घृत्ति अशोकपाशी प्रकट करण्याची हुरहुर लागून राहिली होती. आपलें गुदमरलेलें व गोंधळलेलें अंतरंग त्याच्याजवळ उघडें करण्यासाठी त्या अगदी उतावीळ झाल्या होत्या. त्याप्रीत्यर्थ त्यांनी प्रयत्नांची पराकाष्ठा चालवली होती. एकहि संधि त्या वाया जाऊं देत नसत.

एक दिवस वर्ग चालू असतांना मधु डुलक्या घेऊं लागला, तशी गुलाबबाईंनी सहज चौकशी केली. तेव्हा तो पटकन् म्हणाला,

" माझे बाबा किनई, कां कुणास ठाऊक,—रात्रीचे रडत असतात. त्यांना रडतांना पाहून मग मलासुद्धा रडायला येतं. अन् मग सारी रात्र झोप येत नाही. रात्रीं झोप झाली नाही की मग अशी दिवसा शाळेंत झोप येते."

मधूचे हे अजाण बोल ऐकून गुलाबबाईंना अचंबा वाटला. चिंतेनेदेखील त्यांच्या डोक्यांत डोकावलें. अशोकसारखा कणखर घृत्तीचा पुरुष कां बरें शोक करीत असावा ? ह्यावर त्यांनी खूप विचार केला, परंतु त्यांना त्याचें उत्तर मिळालें नाहीं. पुष्कळ विचार करून, शेवटच्या तासाला त्यांनी धाडस करून मधूच्या पाटीवर लिहून ठेवलें,—

" अशोक,

घरांत मोठ्या माणसांनी दु:ख केलं तर त्याचा घरांतील लहान मुलांवर विपरीत परिणाम होतो. आपण आपल्या बालकांची काळजी घ्यायला नको का ?

मधूच्या
गुलाबबाई."

संध्याकाळीं घरीं गेल्यावर अशोकने पाटी वाचली. तो एकदम दचकला. गुलाबबाईसारख्या तिऱ्हाईत तरुण स्त्रीला आपलें खाजगी दु:ख कळलें,—ह्याचा त्याला विषाद वाटला.

रात्रभर त्याने खूप विचार केला.

सकाळीं उठल्याबरोबर मात्र त्याला फार आश्चर्य वाटलें. कारण काल संध्याकाळीं आणि रात्रीं ज्या गोष्टीचा त्याच्या मनाला विषाद वाटत होता,— नेमकी तीच गोष्ट घडल्याबद्दल आज त्याच्या मनाला विलक्षण सुख होत होतें. पुरुषाचें एखादें गुप्त दु:ख जर स्त्रीला समजलें, आणि तें तिने जाणलें, तर पुरुषाच्या व्यथित मनाला विचित्र प्रकारचें परंतु गूढ, रम्य सुख लाभतें. अशोकचें तसेंच झालें. आपल्या अंत:करणांतील अगदी खोल खोल रुतलेलें दु:ख,— गुलाबबाईसारख्या तरुण, देखण्या स्त्रीला कळलें — ह्या घटनेने त्याचें मन विलक्षण सुखावलें !

त्या सुखावलेल्या अवस्थेंतच अशोकने गुलाबबाईंना पाटीवर उत्तर लिहिलें.

अशोकचें उत्तर वाचून गुलाबबाईंना आनंद झाला. फार मोठा टप्पा थोड्या अवकाशांत गाठल्याबद्दल त्यांच्या अधिऱ्या

मनाला धीर वाटूं लागला. तरी पण अजून खूप लांबचा पल्ला पोहोचायचा आहे, ह्याचा त्यांना विसर पडला नाही.

दिवस चालले होते.

गुलाबबाई व अशोक ह्यांची पाटीवरील पत्रापत्रीहि अव्याहतपणे चालू होती.

आता पत्रांचा आकार वाढला होता.

हळूहळू मधूची पाटी अपुरी वाटूं लागली.

छोटी पाटी जाऊन मोठा कागद आला.

कागदाची चौकोनी घडी मधूच्या पुस्तकांतून गुपचूप प्रवास करूं लागली.

ऐसपैस कागदावर पत्रें व उत्तरें जाऊं येऊं लागलीं.

अलीकडे गुलाबबाईहि जास्त निश्चयाने लिहूं लागल्या होत्या. त्यांना निश्चिति वाटायला लावणाऱ्या कांही घडामोडी घडल्या होत्या. आपल्याला अशोक नाही म्हणणार नाहीत अशी खात्री,—त्यांच्याविषयींच्या भावनेने ओथंबलेल्या त्यांच्या मनाला वाटत होती. एक प्रकारचा आत्मविश्वास त्यांच्या प्रत्येक पत्रांत दिसत होता.

नाही तरी हल्ली, अशोकच्या उत्तरांमुळे आणि विशिष्ट विचारांवरून गुलाबबाईंना त्याच्याविषयी दृढ विश्वास वाटूं लागला होता. कांही झालें तरी अशोक आपली निराशा करणार नाहीत अशी खात्री त्यांना वाटत होती. आणि त्याच खात्री-पूर्वक विश्वासाच्या पोटीं—आज त्या अशोकला पत्र लिहायला बसल्या होत्या. कांही तरी नाजुक विचार मनांत तरळून त्यांच्या

ओठांच्या पाकळ्या विलग झाल्या. पाकळ्या एकमेकांवर टेकल्या-वर त्या लिहूं लागल्या.——

" प्रिय अशोक,

आज मी मोठं धाडस करणार आहें. माझं सारं मनोधैर्य उपयोगांत आणून आज मी तुम्हांला लिहिणार आहें. मानासिक, भावनैक व शारीरिक — माझ्या अंगांतील सारं बळ एकवटून आज मीं तुम्हांला लिहायचं ठरवलं आहे.

ॲरिस्टॉटलनं एके ठिकाणीं म्हटलेलं आहे,

'Whatsoever that be within us that feels, thinks and animates, is something celestial, divine and consequently imperishable.'

( ' आपल्या हृदयांत ऊर्मि उसळविणारी, विचारांना चालना देणारी, आणि साऱ्या अवयवांत जिवतपणा आणणारी जी कांहीं शक्ति आहे,–ती दिव्य, दैवी, अन् म्हणून अविनाशी आहे.' )

ॲरिस्टॉटलच्या सुभाषितांत एकाच शब्दाचा फरक करून मी तुम्हांला आवर्जून सांगणार आहें की,

Whatsoever that be within ME that feels, thinks and animates, is something celestial, divine and consequently imperishable.

( हृदयांत ऊर्मि निर्माण करणारी, विचारांना गति देणारी, आणि देहांत चैतन्य आणणारी जी कांही शक्ति माझ्यामध्ये निर्माण झालेली आहे — ती दिव्य, दैवी, अन् म्हणून अवि-नाशी आहे.)

अगदी प्रथम मी तुमचा अपमान केला, त्या दिवसापासून तों आता ह्या क्षणापर्यंत माझ्यामध्ये प्रचंड क्रान्ति झाली आहे. तुमचा जगावेगळा स्वभाव, तुमचं श्रेष्ठ चारित्र्य, तुमचे तेजस्वी व सखोल विचार, आणि तुमचं दिव्य व रमणीय व्यक्तिमत्व—हें सगळं अवलोकून व अनुभवून, माझा सारा गर्व, गुर्मी व अभिमान विलयाला गेला आहे. माझा शिक्षणाचा गर्व, माझी संपत्तीची गुर्मी, आणि माझा सौन्दर्याचा अभिमान—सारं सारं आज नष्ट झालं आहे — मरून गेलं आहे ! आज मी खरीखुरी, साधीसुधी, शुद्ध, स्वच्छ व जातिवंत स्त्री झालें आहें.

ज्या दिवशीं मीं तुमचा अपमान केला, आणि तुम्हीं शान्त राहून त्याचा प्रतिकार केलात, त्या दिवसापासूनच मी माझ्या अंतरंगाचा शोध घेऊं लागलें. माझ्या मनाला जळमटं झालीं होतीं. माझं हृदय कोळिष्टकांनी भरलेलं होतं. तीं साफसूफ करून, तिथं अमृताचा वर्षाव व्हायला आजपर्यंतचा काळ लोटावा लागला.

देवघरांत देवापुढं बसून आराधना करण्यासाठी जसं भक्ताला शुचिर्भूत व्हावं लागतं, तशी मी आज शुद्ध, स्वच्छ झालें आहें. आता तुमची—हो तुमची, माझ्या देवाची आराधना करण्यासाठीं मी पात्र झालें आहें !

तुमच्या प्रभावी व्यक्तित्वानं माझ्या मनांत प्रथम जबरदस्त मोह निर्माण केला. दुधाचा आटून खवा व्हावा, त्याप्रमाणं मानसिक यातनांच्या धगीवर माझा मोह भाजून निघाला असून, त्याचं रूपान्तर आज उत्कट भावनेंत झालं आहे. ती भावना प्रमाथि आहे. माझं हृदय तिनं व्यापून टाकलं आहे. माझे आचार

विचार--माझ्या साऱ्यां आयुष्यांतच तिनं क्रान्ति घडवून आणली आहे.

माझ्या अंत:करणांतील ती दिव्य ( Divine ) भावना तुमच्यापुढं प्रकट करण्यासाठीच मी हें पत्र लिहायला बसलें आहें. तुम्हांला त्या भावनेची स्पष्ट जाणीव करून देण्याकरितां मीं आजचं हें धाडस केलं आहे.

निसर्गानं माझ्या मनांत तुमच्याविषयी प्रीतीची भावना निर्माण केली. त्या भावनेनं माझ्या हृदयांत ऊर्मि उत्पन्न केल्या, माझ्या विचारांना गति दिली, आणि माझ्या तारुण्यानं उमललेल्या ह्या देहांत नवीन चैतन्य आणलं. ती भावना दैवी आहे, दिव्य आहे, -- आणि म्हणूनच अमर आहे. ती भावना मी तुम्हांला अर्पण करीत आहें! त्या भावनेला सांठविणारं हृदय मी तुमच्या पायाशीं वाहत आहे,--त्याचा स्वीकार करावा.

सुवर्ण-कलशांतील अमृत तुमच्या पायांवर ओतलं आहे. पुढचं आता तुमच्या स्वाधीन.

अपेक्षा करणारी

**गुलाब.''**

गुलाबबाईंनी सगळें पत्र पुन: पुन्हा वाचलें. शेवटीं मनाचा हिय्या करून त्यांनी तें पाकिटांत घातलें. पाकीट चिकटविल्या नंतर त्यांना सकाळच्या स्वप्नाची आठवण झाली. त्यांनी पाकीट फोडलें, आंतला कागद काढला, आणि स्वत:च्या सहीखाली उरलेल्या जागेवर लिहायला सुरवात केली,

" ताजा कलम—

आणखी एका विचित्र घटनेनें मी स्तिमित झालें आहें. आज पहांटे मला स्वप्न पडलं. सध्या आसमंतात् वसंत फुललेला आहे. पण पहांटे माझ्या स्वप्नांत मात्र हिरवागार आश्विन बरसत होता. सगळीकडे दीपोत्सव चालला होता. लोक दिवाळीचा आनंद मनमुराद लुटत होते. आमच्या बंगल्यांत चहुबाजूंना मीं शेकडो पणत्या लावल्या होत्या. ती ज्योतींची जेवणावळ भारी मोहक दिसत होती. मंद शीतल वाऱ्याच्या झुळुकेसरशी फुरफुरणाऱ्या त्या नाजुक ज्योतींच्या मेळाव्यांत-माझं इवलंसं मनदेखील फुरफुरूं लागलं. वसुबारसेच्या दिवशीं वारा पिऊन उड्या मारणाऱ्या वासराप्रमाणं तें नाचूं बागडूं लागलं. मला फार हर्ष झाला. त्या हर्षाच्या धुंदींत असतांनाच मला जाग आली मी पटकन् उठून बसलें. भोवताली पाहिलं,—एकहि दीप वा ज्योत माझ्या आसपास नव्हती. चैत्रांतलं पहांटेचं मादक चांदणं बिछान्यावर पडलं होतं. आता माझ्या ध्यानांत आलं की —तीं दिव्यांची मेजवानी हें एक स्वप्न होतं. दीपोत्सवाच्या स्वप्नांतून जागी झालें तों पुढं खरंखुरं चांदणं पसरलेलं. दिवाळीच्या लखलखीत स्वप्नानंतर लगेच नाजुक, शुभ्र चांदणं—हा योगायोग खरोखरीच मोठा रम्य अन् रमणीय होता !

सकाळीं उठल्यानंतर त्या स्वप्नावर मीं खूप विचार केला. नुकताच वाचलेला डॉ. सिगमण्ड फ्राइड मी आठवूं लागलें. परंतु ह्या स्वप्नाचा नीटसा उलगडा होईना. डॉ फ्राइडचा मानसशास्त्रावरील ग्रंथ काढून तो मी चाळूं लागलें. तेव्हा एके ठिकाणीं लिहिलेलं मला आढळलं, 'स्वप्नांत दीपोत्सव दिसल्यास निष्प्रेम माणसाच्या आयुष्यांत प्रेमी व्यक्ति प्रवेश करते........

प्रेमी जनांची इच्छा पूर्ण होते.........आयुष्यांत मंगल कार्य होतें.........'

मी स्तिमितच झालें !

काय विलक्षण योगायोग होता !

किती तरी दिवसांपूर्वी माझ्या मनांत तुमच्याविषयीं प्रीति निर्माण झालेली. मी एकटीच तिच्याशी चाळा करीत होतें. पण माझ्या आसुसलेल्या हृदयाची आस त्यानं शमेना. 'हुतुतु'-चा खेळ एका माणसाला खेळतांच येत नाही. त्याला कमीत-कमी दोन खेळाडू लागतात. तद्वतच प्रीतीचं असावं. तिला मध्ये ठेवून दोन व्यक्तींनी तिच्या भोवती फेर धरला,—आणि तिच्यासमोर फुगडी—झिम्मा खेळला तरच ती फुलते. 'हुतुतु'-च्या डावाप्रमाणंच प्रीतीचा खेळ असतो. दोन्हीहि बाजू हिरीरीनं व सरसावून खेळल्या तरच त्यालासुद्धा रंग भरतो. एक मोठा फरक मात्र या दोन खेळांमध्ये आहे. 'हुतुतु'मध्ये एका पक्षाचा पराजय झाल्याशिवाय दुसऱ्या बाजूचा विजय होत नाही, आणि त्या खेळाची सांगता होत नाही. प्रणयाच्या खेळांत मात्र तसं नाही. तिथं दोन्ही बाजूंचा विजय व्हावा लागतो; तरच प्रेमाची सांगता होते.—ही एक बाब सोडली तर—प्रीतीचा खेळ हा निव्वळ 'हुतुतु'चा डाव आहे !

स्त्रीच्या हृदयांतील प्रीतीचा उद्भव आणि पहाटे पडलेलं दीपोत्सवाचं हें स्वप्न—हा योगायोग विलक्षणच म्हटला पाहिजे !

फ्राइडची स्वप्नमीमांसा खरी की खोटी—हेंच आता ठरायचं राहिलंय.

उत्सुक

**गुलाब."**

गुलाबबाईनी सगळें पत्र पुन्हा एकदा वाचलें. ताजा कलम बारकाईने नजरेखालून घालायला त्या विसरल्या नाहीत. सुटका व उत्कंठा ह्यांचा मिश्र निःश्वास टाकून त्यांनी पत्र बंद केलें. पाकिटावर अशोकचा पत्ता लिहून, तें स्वतः पोस्टाच्या पेटींत टाकल्यानंतरच त्यांच्या अस्वस्थ जीवाला शान्तता वाटूं लागली; विचार करून श्रान्त झालेल्या त्यांच्या हळव्या मनाला विसांवा मिळाला. एक विलक्षण समाधान आता त्या अनुभवूं लागल्या.

* * *

# ४

अशोकच्या हातांत, गुलाबबाईचें पत्र पडलें, तेव्हां तो समोर जमिनीवर बसलेल्या वृद्ध भिकारणीचें चित्र पुढ्यांतल्या कॅनव्हसवर कुंचल्याने काढीत होता. त्या एकाच चित्रावर आज किती तरी दिवस तो सारखी मेहनत घेत होता. ' दोन भिकारणी ' हें चित्र दिल्लीला भरणाऱ्या ' भारतीय चित्रकला प्रदर्शना 'मध्ये पाठविण्यासाठी तो तयार करीत होता. ' दोन भिकारणी 'पैकीं एक भिकारीण त्यानें आधींच चितारली होती. तिचें हुबेहुब चित्र रेखाटण्याकरिता त्याला केनेडी ब्रिजवरील हिरव्या माडींत जावें लागलें होतें. तेथे जाऊन, तिथल्या एका कलावंतिणीचें नृत्याच्या पवित्र्यांतील चित्र त्याने स्वतःच्या फलकावर जसेंच्या

तसें उतरविलें होतें. चेहऱ्यामध्ये अपरिहार्य म्हणून त्याने थोडासा बदल केला होता. बाकी हुबेहुब नर्तन करणारी भावीण त्याच्या कुंचल्याने काढली होती.

ती अशोकच्या कल्पनेंतील पहिली भिकारीण !

आणि आज दुसरी खरीखुरी भिकारीण तो चितारीत होता.

कलावन्तीण व भिकारीण !

त्याच्या दृष्टीने दोघी सख्या बहिणी ! दोघी भिकारणचि ! एक शीलाने – तर दुसरी पैशाने !

परत दोघींचा व्यवसाय एकच. भीक मागणें. पैशाची भीक मागणें ! व्यवसाय एकच असला तरी दोघींचे मार्ग भिन्न. एकीने शरीराचा बाजार मांडला होता,–तर दुसरी आपल्या हीन-दीनतेचें प्रदर्शन करीत बाजारांत बसली होती !

त्याच्या चित्रांतील कलावंत अप्सरा नृत्यांत बेहोष झाली होती;–आणि खरी म्हातारी भिकारीण फुटका वाडगा पुढे करून भीक मागत होती.

कलावंतिणीच्या मुखावर उन्माद ओसंडत होता; तर भिकारणीचा चेहरा वार्धक्य, भूक व असहायता ह्यांनी कोमे-जून गेलेला.

अशोकने चित्राचें नांव ठेवलें होतें–'दोन भिकारणी.'

कुंचलीचे शेवटचे नाजुक फटकारे देऊन, त्याने भिकारणीचें चित्र पुरें केलें.

वृद्ध भिकारीण गेल्यानंतर तो जागचा उठला. पलीकडे अंथरलेल्या सतरंजीवर जाऊन बसल्यावर अशोकने गुलाबबाईचें

पाकीट फोडलें. पाठीमागे असलेल्या वळकटीवर कलंडून त्यानें तें सारें पत्र वाचून काढलें.

नंतर दोनतीन दिवस त्यानें गुलाबबाईच्या पत्रावर खूप विचार केला. गुलाबबाईच्या पत्रावर म्हणण्यापेक्षा, गुलाबबाई-सारख्या शिकलेल्या, श्रीमंत स्त्रींचा कसा काय तोल गेला, ह्याचाच तो विचार करीत होता. अखेरीस, एक दिवस रात्रीं, मधु झोपल्यानंतर तो गुलाबबाईंना उत्तर लिहिण्यासाठी बसला. संत्रस्त कपाळावर नाचणारी केसांची झुपकेदार बट मागे सारीत, अशोकने आपली झरणी सुरू केली,—

" गुलाबबाई,

तुमचं पत्र वाचलं. काय वाटलं तें प्रामाणिकपणं सांगूं ? का खोटं ढोंग करूं ? काय करूं ? बोला !—पण हें मी तुम्हांला काय विचारतों ? ढोंग, खोटेपणा माझ्या रक्तांतच नाही. मी जें कांही बोलतों तें स्पष्ट—आणि करतों तें उघडपणें. माझ्यापाशी आंत एक, बाहेर एक—हें नाही. त्या माझ्या सडेतोड स्वभावाला अनुसरूनच, तुमचं प्रेमपत्र वाचून खरोखर मला काय वाटलं तें इथं लिहायचं मीं ठरवलं आहे. हें पत्र तुमच्या पत्राचं उत्तर नव्हे. क्रियेची प्रतिक्रिया, त्याप्रमाणं तुमच्या पत्राला हें प्रतिपत्र समजा. कांही महत्त्वाच्या मुद्दयांचं विवेचन करून माझे स्वतःचे विचार मी तुमच्यापुढं मांडणार आहें.

तुमच्या तरुण मनांत प्रीतीचा उद्भव झाला हें वाचून आनंद वाटला. त्याबद्दल मी तुमचं अभिनंदन करतों !—पण एक गोष्ट आपल्याला विचित्र वाटली बुवा ! तुमच्या प्रीतीचं लक्ष्य मला तितकंसं पसंत नाही. रतीचा नजर-बाण मदनाच्याच उरांत

जाऊन खुपसला पाहिजे ! एखाद्या भणंगाच्या पोकळ छातींत शिरून त्याचा काय उपयोग ? तुमचं तसंच झालंय ! फार खाली उडी घेतलीत. तुमच्यासारख्यानं आकाशांत उंच उंच भरारी घ्यायला पाहिजे होती. अगदीच चुकीचा नेम धरलात. तुमचं सावज अतिशय सामान्य आहे. हत्तीवर आरूढ होऊन तुम्हीं शेळीची शिकार केलीत ! शिकारी एक सधन, सुंदर स्त्री,—आणि सावज मात्र भिकारडा चित्रकार. शिकारीला शिकार मुळींच शोभत नाहीं !—''

अशोकचें पत्र लिहिणें पुष्कळ वेळ चाललें होतें. शेजारच्या घड्याळांत अकराचे ठोके पडले तसा तो थांबला; आणि आतापर्यंत लिहून झालेले कागद मोजूं लागला,

'एक, दोन,....चार .... सात ........ अकरा ........ अबब ! फार लांबलं. लवकरच आटोपतं घेतलं पाहिजे आता.'

पत्र संपविण्याच्या उद्देशाने शेवटीं त्याने लिहिलें,

"पुष्कळच मोठं झालं — नाहीं पत्र ? — पण माझा नाइलाज आहे. विषयच तसा महत्त्वाचा असल्यामुळं मला विस्तृतपणे चर्चा करावी लागली. त्यामुळं तुम्हांलादेखील बऱ्याच गोष्टींचा उलगडा सहजासहजी होईल, अशी मला खात्री आहे. विषयाचा खोलवर ठाव घेऊन विवरण केल्याबद्दल तुम्हांलासुद्धा समाधान वाटेल अशी आशा मी बाळगतों.—बरं, जातों !—"

स्वत:ची कलात्मक सही करून — त्याने पत्र संपविलें.

दुसरा सबंध दिवस गुलाबबाईंना लिहिलेल्या पत्रावर त्याने विचार केला.

संध्याकाळीं मधूला आणण्यासाठीं शाळेंत जातांना ठाकुरद्वार नाक्यावरील पोस्टाच्या पेटींत त्याने तें टाकलें.

शाळेमध्ये पोहोचल्यानंतर, मेंदीच्या बनांत जाऊन तो उभा राहिला, तेव्हा गुलाबबाई पहिल्या यत्तेची परवचा घेत होत्या.

खिडकींतून अशोक दिसला,—तशी त्यांच्या मनांत खळबळ सुरू झाली. त्यांनी त्याला पत्र लिहिल्याला आज चार दिवस उलटून गेले होते अजून त्याचें उत्तर आलें नव्हतें. पत्राचा कांहीच उल्लेख गेल्या तीन दिवसांत त्याने केला नव्हता. मधूच्या निमित्ताने दररोज त्या दोघांच्या गांठीभेटी व्हायच्या; परंतु अशोकने एकाहि शब्दाने पत्राविषयी वाच्यता केली नव्हती. तेव्हा साहजिकच गुलाबबाईचें मन साशंक झालें. त्यांना अशोकच्या उत्तराची विलक्षण हुरहुर लागून राहिली होती. परंतु आतापर्यंत त्या विचारायला धजल्या नाहीत.

आज मात्र कसला तरी निश्चय त्यांनी मनाशीं केला. आंत माजलेली खळबळ बाहेर दिसूं न देतां त्या पुढे झाल्या. त्यांना पाहून अशोकदेखील सोप्यांत गेला. इकडचें निकडचें बोलणें झाल्यावर, गुलाबबाईनी भीत भीत हळूच पण पटकन् विचारलें,

"माझं पत्र मिळालं ?"

"हो."

"केव्हा ?"

"केव्हाच !"

"मग—"

गुलाबबाई अडखळलेल्या पाहून अशोकने हसत म्हटलें,

" काल रात्रींच उत्तर लिहिलं. आत्ता येतांना टाकलं. उद्या सकाळींच तुमच्या हातांत पडेल.........खूप मोकळेपणानं लिहिलंय. माझा मोकळा स्वभाव पाहून तुम्हांला खचित आनंद होईल ! "

अशोकचे शेवटचे शब्द ऐकून गुलाबबाईंना हर्ष झाला. त्यांच्या मनांतील खळबळ नष्ट होऊन तेथे गोड हुरहुर निर्माण झाली. त्यांचा चेहरा एकदम प्रसन्न दिसूं लागला.

मधु आपला वडिलांचा हात धरून जाऊं लागला, तशा त्याच्या मास्तरीणबाई दोन पावलें पुढे सरकल्या. त्या दोघांच्या पाठमोऱ्या आकृति दिसेनाशा होईपर्यंत त्या खाली पायरीवर येऊन उभ्या राहिल्या.

अशोकचें शेवटचें वाक्य अजून त्यांच्या कानांत घुमत होतें,—'.........तुम्हांला खचित आनंद होईल ! ........' शेवटी हर्ष हृदयांत मावेनासा होऊन, तो त्यांच्या मुखावाटे अजाणतां बाहेर पडला, '—खचित आनंद होईल !........ अशोक, तुमचा मोकळा स्वभावच काय, पण तुमची प्रत्येक गोष्ट माझ्या मनाला आल्हाद देते ! कसं दाखवूं तुम्हांला ! – कसं सांगूं तुम्हांला ? '

नाना तऱ्हेच्या मधुर विचारांनी व नाजुक भावनांनी त्यांच्या बुद्धिमान डोक्यांत गर्दी केली.

रात्रीं बिछान्यावर पडल्यावर गुलाबबाईंना झोप आली नाही. त्यांचें भावनाप्रवण मन फार अस्वस्थ झालें. सारखें त्यांच्या मनांत येई,

--'....प्रेमपत्राचं उत्तर !....माझ्या प्रेमपत्राचं उत्तर ! कसं बरं अशोकनी लिहिलं असेल तें ? काय काय शब्द वापरले असतील ?--माझ्या भावनेचा स्वीकार केला असेल ना --पण हा संशय मला येण्याचं कारण काय ? त्यांनीच जातांना म्हटलं नाही का, की तुम्हांला खचित आनंद होईल. --मग हा वृथा संशय कां ? ' त्यानी आपल्या मनाचें भरघोंस समाधान केलें. तरी पण त्यांचें मन स्वस्थ होईना. त्यांनी मारून मुटकून आपल्या मनाला झोपवलें.

ती सारी रात्र,--नाजुक आणि गोड स्वप्नांनी त्यांना भंडावलें.

मोठ्या पहांटे त्या उठल्या.

वेणीफणी करून त्या बंगल्यासमोरच्या बागेंत आल्या, तेव्हा झाडांचे शेंडे उगवत्या उन्हाने पिवळे झाले होते. कोवळ्या किरणांचा झाडांझुडुपांवरील तो बागडता विलास पाहून गुलाबबाईना अतिशय प्रसन्न वाटलें. कोठल्या तरी अज्ञात रम्य प्रदेशांत त्यांचें भारावलेलें मन सहल करूं लागलें. उंच उंच आकाशांत विहरणारी स्वतःची मुग्ध नजर त्यांनीं चौफेर फिरविली.

वातावरणांत सर्वत्र वसंत ऋतु फुलला होता.

आंब्याला मोहोर आला होता. बकुळी फुलली होती. मोगरा डंवरला होता. रातराणी फुलांच्या भाराने लवली होती. पारिजाताखालची हिरवळ लालभडक झाली होती. फणस फळांच्या भाराने वाकला होता. हिरवा चाफा मादकपणे दरवळत होता. आणि सोनचाफा केशर-कस्तुरी उधळीत होता.

फुलें, फळें, झाडांच्या साली, जमिनीवरचा पाचोळा, आणि वखवखलेली माती—ह्या सगळ्यामधून रम्य वासन्तिक सुगंध दरवळत होता.

चैत्रांतील वाऱ्याच्या थंडगार, मादक झुळुका मंदपणे वाहत होत्या.

पक्षांच्या मंजुळ किलबिलाटाने चारी दिशा दुमदुमून गेल्या होत्या.

सारी सृष्टि वसंताने मोहोरून टाकली होती. सृष्टींतील कण न् कण ऋतूच्या उन्मादाने धुंद होऊन नाचत बागडत होता.

मुळांतच रमणीय असलेल्या निसर्गाचा हा वासन्तिक विलास न्याहाळून गुलाबबाई मुग्ध झाल्या. सृष्टिसौन्दर्याची ही मोहक मेजवानी चाखून त्यांचें हळुवार मन अतिशय आनंदून गेलें. अभावितपणे उसळलेल्या त्या आनंदाच्या ऊर्मींनी त्या अन्तर्मुख झाल्या, तों—काय आश्चर्य ! तेथे अंतःकरणांतदेखील वसन्त ऋतु तितक्याच उत्कटतेने फुललेला होता.

ग्रीष्माच्या शेवटीं वळवाच्या धारांसाठीं धरती कशी व्याकुळ झालेली असते !—तद्वत् गुलाबबाईंचें तडपलेलें हृदय अशोकच्या प्रीतीच्या बरसातीची प्रतीक्षा उत्सुकतेने करीत होतें.

बाहेरची सृष्टि, आणि आंतलें मन—ह्यांच्याप्रमाणे, गुलाबबाईंचें शारीरिक सौन्दर्यसुद्धा आज फुललेलें दिसत होतें.

सकाळींच बगीच्यांत येण्यापूर्वी, स्नान वगैरे आटोपून त्या तयार झाल्या होत्या. पिवळ्या रंगाची, काश्मीरी सुळसुळीत

साडी नेसून, आकाशी ब्लाउजखालीं त्यांनीं आपलें उन्नत उरोज झाकलें होतें. गळ्यांत पांढऱ्या शुभ्र मोत्यांची माळ रुळत होती. उजव्या हातांत सोन्याचे बिल्वर घालून, डाव्या मनगटावर त्यांनी लहानसें नाजुक घड्याळ बांधलें होतें. कानांमध्ये हिऱ्याच्या कुड्या लखलखत होत्या.—आणि अंबाड्यावर बटमोगरा उमलला होता.

उंच – मध्यम बांधा, पिवळा गोरा वर्ण, गोल चेहरा, रुंद कपाळ, काळेभोर टपोरे डोळे, सरळ नाक, नाजुक जिवणी, आणि मोहक हनुवटी—ह्या नैसर्गिक साजांत गुलाबबाई इंद्राच्या उर्वशी वाटत होत्या !

लक्ष्मीचें तेज त्यांच्या चेहऱ्यावर चमकत होतें.

वडिलांच्या श्रीमंतीने त्यांचें सौन्दर्य जास्तच खुलून दिसत होतें.

त्यांच्या सुंदर शरीरसंपदेप्रमाणे. गुलाबबाईचें प्रणयी मन-सुद्धा आज विशेष उल्हसित झालें होतें. निळ्या सरोवराच्या थरथरत्या पृष्ठभागावर एखादी कमलिनी आपलें सर्वस्व एकवटून डवरून उमलावी, तसें त्यांचें प्रेमी मन साऱ्या आन्तरिक शक्ति एकत्र होऊन फुलारलें होतें. आपल्या प्रेमपत्राला अशोकांनी लिहिलेलें उत्तर आज वाचायला मिळणार,—ह्या कल्पनेने त्यांचें मन बहरून आलें होतें.

त्या रमणीय मुग्धावस्थेंत गुलाबबाई मोगरीच्या कुंजांत आल्या, आणि खालीं हिरवळीवर बसल्या. पत्र मिळण्याचा क्षण जसजसा जवळ येऊं लागला, तसतसें त्यांचें अस्थिर मन कांपूं लागलें. तेव्हा त्यांनी स्वत:शींच म्हटलें, 'असं कां व्हावं ?

माझी अशोकांबद्दलची भावना किती खोल रुजलेली आहे! त्यांच्या बाबतींतले माझे विचार केवढे विशाल आहेत!.... पहिल्या प्रथम सामान्य माणसाच्या जीवनांतून त्यांची सुटका करणार आहें मी. एवढी श्रेष्ठ कला अंगांत भिनलेली असतांना, त्यांचा अर्ध्यापेक्षा अधिक दिवस केवळ भाकरीसाठी काबाडकष्ट करण्यांत जावा, ही केवढी दुर्दैवी घटना आहे! तें कांही नाही,— त्यांच्या कमनशिबी आयुष्यांत मी आमूलाग्र बदल करणार आहें. त्यांचं निरीक्षण वाढायला संधि मिळायला पाहिजे. त्यासाठी त्यांना प्रवास करायला हवा. सुंदर सुंदर स्थळं पहायला मिळायला हवींत. रम्य प्रदेशांत व नाना तऱ्हेच्या लोकांमध्ये वास्तव्य व्हायला पाहिजे. अभ्यासासाठी मौलिक ग्रंथ पाहिजेत.—हें सारं मी अशोकांसाठी करणार आहें. घरच्या गरीबीमुळं आर्ट स्कूलमधील साधा कोर्सदेखील त्यांना अर्धवट सोडावा लागला—हें हेडबाईंनी सांगितलं तेव्हा मला अतिशय वाईट वाटल. मनाचा संताप झाला. काकांच्यापाशी कुजत पडलेल्या संपत्तीची किळस आली. त्या संपत्तीचा आता मी सदुपयोग करणार आहें. चित्रकलेचं सर्वोच्च शिक्षण घेण्यासाठी मी अशोकांना इटलीला पाठवीन.—माझे काका सूज्ञ आहेत. स्वत:चा घाम गाळून त्यांनी पैसा मिळविला आहे पैसा ही किती कष्टसाध्य गोष्ट आहे ह्याची त्यांना पुरेपूर कल्पना आहे. आयत्या पिठावर रेघोट्या ओढणारे ते नाहीत.—त्यामुळं अशोकांच्या परिस्थितीचं त्यांना झटकन् आकलन होईल. त्यांचे किमती गुण ते जाणतील. त्या गुणांचं चीज करण्याच्या माझ्या बेताला ते नक्कीच हरकत घेणार नाहीत.—'

गुलाबबाईंची विचारसमाधि अजून किती तरी वेळ चालू राहिली असती. परंतु मध्येच बंगल्याचें फाटक करकरलें. समाधि भंगून त्या भानावर आल्या.

फाटक उघडून पोस्टमन बंगल्याकडे चालला होता.

गुलाबबाईंनी धावत जाऊन त्याच्या हातांतलें पत्र घेतलें. घाईघाईने स्वतःच्या खोलींत जाऊन अशोककडून आलेलें फिकें आकाशी पाकीट त्यांनी फोडलें. आंतील निळ्या कागदांची जाड घडी पाहून त्यांना खूप आनंद झाला. त्या अननुभूत आनंदाच्या भरांत त्यांनी पत्र वाचायला केव्हां सुरवात केली हें त्यांचें त्यांनाच समजलें नाही. पहिलें पान उलटल्यानंतर गुलाबबाई मोठ्या उत्सुकतेने वाचूं लागल्या. अशोकने लिहिलें होतें,—

" आता दुसऱ्या मुद्दयाकडे वळतों.

आजपर्यंतच्या तुमच्या अनेक पत्रांतून, तुम्हीं माझ्याविषयी कळकळ अन् सहानुभूति प्रकट केली आहे. त्या सहानुभूतीच्या पोटींच, मला वाटतं, तुमच्या ह्या प्रीतीनं जन्म घेतला असावा.

आतापर्यंत किती तरी वेळां मीं ठरवलं की,—सांगून टाकावं. पण तुम्हांला वाईट वाटेल, दुःख होईल—म्हणून मी इतके दिवस गप्प बसलों. पण आता तसं करणं धोक्याचं आहे; आणि म्हणून आज मी तुम्हांला निक्षून सांगतों की, मला तुमची सहानुभूति नको आहे. तरुण स्त्रीच्या सहानुभूतीची मला फार भीति वाटते. ती सहानुभूति तिच्या प्रेमाची पहिली अवस्था असते. तींतूनच पुढं प्रीति जन्माला येते. स्त्रीची—अन् त्यांत भर ज्वानींत आलेल्या स्त्रीची प्रीति विस्तवासारखी

असते. विस्तव भाकरी भाजतो,—आणि चिताहि जाळतो ! त्याप्रमाणं स्त्रीची प्रीति शुद्ध असेल तर ती पुरुषाचं कोटकल्याण करते; पण जर का ती स्वार्थानं बरबटलेली असेल, तर त्या पुरुषाचा संपूर्ण सत्यानाश होतो ! त्याच्या कलेचं वाटोळं होतं. त्याचं ध्येय उध्वस्त होतं;–आणि तो आयुष्यांतून उठतो. हें मी कल्पनेनं, किंवा कुणाचं पाहून वा ऐकून लिहीत नाहीं. हा माझा स्वतःचा जळजळीत अनुभव आहे—तुमची प्रीति मला नको आहे. त्या प्रीतीच्या पाठीमागं असलेल्या स्वार्थी भावनेची मला भीति वाटते. तेव्हा – मला क्षमा करा. मला जगूं द्या माझ्या कल्पनेनुसार मला स्वतंत्रपणे जगूं द्या. प्रेम व प्रपंच ह्यांच्या बंधनांपासून दूर जाऊन माझ्या कलेची भरभराट मला करूं द्या. माझ्या ध्येयाचं शिखर मला गांठूं द्या.

कलेची भरभराट आणि ध्येयसिद्धि ह्यांच्यापुढं, तरुण स्त्रीची प्रीति अथवा तिचा मोह ह्यांची आता मला मातब्बरी वाटत नाही. स्त्रीचं प्रेम सदोदित वासनेनं आणि स्वार्थानं लडबडलेलं असतं – अशी माझी खात्री झालेली आहे. तेव्हा माझ्यावर दया करा. मला सोडा. अगदी मोकळा सोडा. नाजुक धाग्यांनी बांधण्याचा खुळा प्रयत्न करूं नका. ते धागे फक्त दिसायला नाजुक असतात. एरवी ते फार चिवट व दुष्ट असतात. तिरडीवर झोपवल्याखेरीज ते तुटत नाहीत.—तिरडीवर निजेपर्यंत मला जखडून ठेवण्याचा प्रयत्न कृपा करून करूं नका.

शिवाय, कलेची भरभराट व्हायच्या आधी कलावन्ताच्या आयुष्यांत प्रमदेचा प्रवेश,—म्हणजे त्याच्या कलेचा, ध्येयाचा, आणि पर्यायानं त्याच्या साऱ्या जीवनाचा शेवटच होय !

दारिद्र्य व कला ह्यांच्या चुकीच्या संगमामुळं अगोदरच कठीण असलेली माझी जिंदगी जास्तच खडतर झालेली आहे.

आम्हां पांढरपेशा मध्यम वर्गीयांची भाकरी हीच खरी प्रेयसी. तिच्यासाठी खपण्यांतच आमचं सारं आयुष्य जातं. कला नांवाच्या दिव्य स्त्रीनं, चुकून जरी आमच्या आयुष्यांत डोकावलं, तरी लवकरच तिला आपला काढता पाय घ्यावा लागतो. कारण भाकरी आणि कला ह्यांचा झगडा फार प्रखर व भयंकर असतो! भाकरी आणि कला ह्या सख्या सवती होत. त्या दोघींच्या झटापटींत यजमानाचा जिवंत मुडदा पडतो!

माझं तसंच झालं!

माझ्या बाबतींत तर तीन सवती होत्या. भाकरी व कला ह्यांच्या शेजारीं माझी बायको येऊन बसली होती. तिनं भाकरीशी संगनमत केलं; आणि मग – दोघी विरुद्ध एकटी – असा विषम झगडा सुरू झाला. त्या दोघींच्या गटानं कलेला गळा दाबून ठार केलं; – आणि तिच्या यजमानाला – मला – उभ्या आयुष्यांतून उठवलं!

आज माझी बायको गेलेली आहे.

आता दोघींतच झगडा आहे.

परंतु तरीसुद्धा भाकरी कलेला खाली पाडून तिच्या उरावर बसलेली आहे. भाकरीचा विजय झालेला आहे. विजेती स्त्री पुरुषालादेखील आपला दास करते! भाकरीचा आज मी दास झालों आहें. माझ्या मानेभोवती तिनं मगरमिठी टाकली आहे. त्या मिठींतून स्वतःची सुटका करून घेण्यासाठी मी जिवाचा आटापिटा करतों आहें.

आता फक्त एकच गोष्ट माझ्या डोळ्यांपुढं आहे.

माझ्या कलेची भरभराट !

कलेची प्रगति हेंच आता माझं ध्येय !

त्याकरितां अष्टौप्रहर धडपडणं आणि रात्रंदिवस घाम गाळणं — हेंच माझं सध्याचं आयुष्य !

गरीबाला फक्त भाकरीवरच प्रेम करण्याचा अधिकार असतो. कलेसारख्या अप्सरेकडे त्याचं लक्ष जाता कामा नये. कारण तिला पेलण्याचं सामर्थ्य त्याच्यांत नसतं. संपत्तीच्या मलिद्यावरच कला पोसली जाते, आणि वाढीला लागते. तेव्हा, माझ्यासारख्या भणंग भिकाऱ्यानं, खरोखरीच त्या दिव्याङ्गनेच्या वाटेला जायला नको होतं, — आणि त्याप्रमाणं मी गेलोंहि नाही. तुमच्याप्रमाणंच तीसुद्धा आपणहूनच माझ्या पाठीशीं लागली. गळ्यांत पडलेल्या त्या निःस्वार्थी परीला दूर लोटणं कठीण झालं; आणि मी तिच्या भजनीं लागलों.

स्वतःच्या कलेची जोपासना करणं, ती भरभराटलेली पाहणं, — ही माझी महत्त्वाकांक्षा. —पण गरीबाला संसार आणि महत्त्वाकांक्षा — दोन्ही जमत नाहीत हेंच खरं ! त्यानं कारकुनी किंवा मास्तरकी करून टुकुटुकु संसार तरी करावा, किंवा घरादारावर निखारे ठेवून आपली महत्त्वाकांक्षा पुरी करावी. संसार व महत्त्वाकांक्षा ह्या दोन्ही गोष्टी त्याला एकदम कधीच साधत नाहीत. श्रीमंतांचं तसं नाही. पैशाच्या जोरावर ते आपला संसार व्यवस्थित करतात; आणि महत्त्वाकांक्षादेखील पूर्ण करूं शकतात. —माझ्यासारख्या भिकारी माणसानं दोन्ही अपेक्षा करणं नितान्त मूर्खपणाचं आहे.

ज्या वेळीं मी संसारांत पडलों त्या वेळीं ह्या गंभीर सत्याची मला जाणीव नव्हती. आता अनायासच संसारांतून सुटलों आहें, — तर पुन्हा त्या जंजाळांत पडून दुहेरी कात्रीमधील जीवन जगा कशाला ?

परत माझ्यासारख्या निष्कांचन माणसानं प्रेमाच्या फंदांत पडायचं म्हणजे शुद्ध वेडेपणाच ! कारण प्रेम हा श्रीमंतांचा खेळ — आणि चलती असलेल्यांचा चाळा आहे.

गुलाबबाई, तुमच्या पत्रांत प्रीतीच्या खेळाला तुम्हीं ' हुतुतु '-च्या डावाची उपमा दिली आहे. उपमा किती सार्थ अन् सुंदर आहे ! दोन्ही खेळांची तुलना करून, एक फरक दाखवायला तुम्हीं विसरलां नाहींत. पण मी म्हणतों, तो फरकच नव्हे ! दोन्ही डावांतील तें एक प्रचंड साम्य आहे. प्रेमाचा खेळ हा सहीसही ' हुतुतु 'चा डाव आहे. त्यांत थोडादेखील फरक नाही. ' हुतुतु 'मध्ये एक एक करून सारे गडी मारल्याशिवाय दुसऱ्या पक्षाचा विजय होत नाही. प्रीतीमध्येदेखील तसंच आहे. तिथंसुद्धा एक बाजू बाद झाल्यानंतरच दुसरी जिंकते. प्रेमाच्या क्रूर खेळामध्ये एका व्यक्तीचा संपूर्ण पराभव होतो, – ती पुरी उध्वस्त होते, — तेव्हाच दुसऱ्या व्यक्तीला समाधान लाभतं. व्यक्ति ' मारली ' गेल्यानंतर, तिचा पूर्ण बळी घेतल्यानंतरच प्रीतीच्या खेळाची सांगता होते. —हा माझा स्वत:चा अनुभव आहे ! प्रेम म्हणजे नुसती आग ! त्या आगीशी चुंबाचुंबी म्हणजे प्रणयाचा खेळ होय ! त्या आगींत मी पुरा भाजून निघालों आहें. माझ्या अपेक्षाआकांक्षांचीं सालपटं जळून गेलीं आहेत. प्रेमानं एकदा माझा बळी घेतलेला आहे, — मला अगदी

नेस्तनाबूत केलेलं आहे. त्या भावनेच्या सामन्यांत माझा सपशेल पराजय झाला असून, आज जो मी अक्षरशः उध्वस्त झालों आहें तोसुद्धा त्याच्यापायींच.........तेव्हा आता, भाजून निघालेल्याला तुम्ही काय भाजणार ? एकदा मेलेल्याला मारण्यांत मजा तरी काय ?

बाहेरून पिवळं जर्द दिसणारं एखादं फळ आंतून हिरवट निघालं, —तर खाणाऱ्याचं तोंड आंबट होतं. आणि पुढं खरंखुरं पिकलेलं फळसुद्धा तो नेहमी भीतभीत व हिरवटपणानं खातो माझं तसंच झालंय. वस्तुतः तुमच्यासारख्या सर्वगुणसंपन्न स्त्रीचं प्रेमपत्र वाचून मला केवढा हर्ष व्हायला पाहिजे होता ! तुमच्या प्रेमाचा स्वीकार करूं शकत नाही,— म्हणून मला फार वाईट वाटत आहे. परंतु एकदा ठेंच लागलेल्या ठिकाणींच पुन्हा ठोकर खाणं माणसाला तरी शोभत नाही. तसं झालं तर मग माणसांत अन् जनावरांत फरक काय ?

मी माणूस आहें; आणि शेवटपर्यंत माणूसच राहण्याचा प्रयत्न मी करणार आहें.

त्यांत तुमची निराशा आहे !

पण माझा नाइलाज आहे !

मला क्षमा करा."

वाचतां वाचतां गुलाबबाईंचे डोळे पाण्याने भरून आले. पुढचा मजकूर त्यांना दिसेनासा झाला. डबडबलेल्या नजरेला अस्पष्ट दिसणारी सही त्यांनी वाचली,

" एक गरीब चित्रकार

**अशोक महाजन** "

आता गुलाबबाईच्या ओल्या डोळ्यांपुढे अंधारी आली. त्यांच्या उघड्या डोळ्यांसमोर काजवे चमकूं लागले.

नजर मिटून तशाच मागे खुर्चीच्या पाठीला त्या टेकल्या.

केवढी अपेक्षा त्यांनी उराशी बाळगली होती !

--आणि काय झालें !

पुष्पवृष्टीसाठी उभें रहावें,– आणि अग्निवर्षाव व्हावा,— तशी त्यांची अवस्था झाली.

निराशेच्या जबरदस्त धक्क्याने त्यांचें हळुवार मन मूढ बनलें.

त्या दिवशीं गुलाबबाई शाळेंत गेल्या नाहीत. सगळा दिवस स्वत:च्या खोलींत बिछान्यावर पडून त्यांनी काढला. रात्रभर त्यांच्या डोळ्याला डोळा लागला नाही. सकाळीं उठल्यावरदेखील त्यांना हुषारी वाटेना. 'शाळेंतच जाऊं नकोस, आपल्या शिक्षिकेच्या नौकरीचा राजीनामाच देऊन टाक –' असें एक मन त्यांना सारखें म्हणूं लागलें.

परंतु त्यांचें दुसरें मन व्यवहारी होतें. त्याने बाईंना चांगलेंच डिवचलें--' प्रेमांतील निराशेचा अन् नौकरीचा काय संबंध ? प्रेमापायीं आयुष्यांत असले अडथळे येऊं द्यायचे ? प्रेम ही एक करमणुकीची चीज आहे ! '

ह्यावर त्यांचें प्रेमी मन एकदम उसळून उत्तरलें '—प्रेम हें कांहीं करमणुकीसाठी नाही. तें जीवनाचें सर्वस्व आहे ! शिवाय मालकिणीने शाळेंत नौकरी केली नसती तर अशोकची व तिची भेटच झाली नसती; आणि आजची ही निराशा पदरीं पडण्याची वेळच येती ना.—म्हणजे शाळेचा व अशोकचा, आणि

पर्यायाने प्रेमाचा – निराशेचा संबंध आलाच. तेव्हा शाळेंत जाऊन अशोकच्या प्रेमस्मृतीने दु:खी होण्यापेक्षा—'

'दु:खी होण्यापेक्षा ?—' व्यवहारी मनाने प्रेमी मनाला मध्येच खिजविलें. 'अरे बेट्या, प्रेमाची नुसती परवचा म्हणणारा तूं ! प्रेमाचे ठोकताळे तुला काय ठाऊक ? अरे, यजमानणीला सांग की,—अतिशय आवडणाऱ्या माणसाचं प्रेम मिळालं नाही—तरी त्याची दुसरी कोठलीहि वस्तु प्रेमिकाला भारी प्रिय वाटते. चित्रकार अशोक नसला तरी अशोकचा चिमणा चिरंजीव शाळेंत आहे.—तो तिला नक्की सुखवील.'

गुलाबबाईच्या दोन्ही मनांची चांगलीच जुंपली होती.

पण अखेरीस त्यांच्या व्यवहारी मनाने प्रणयी मनावर मात केली.

त्या नेहमीप्रमाणे अकरा वाजता शाळेंत गेल्या.

चिमुकल्या मधूला पाहिल्याबरोबर बाईंच्या अशोकविषयीच्या प्रीतिभावना उचंबळून आल्या.

वेगाने पुढे होऊन त्यांनी मधूला कडकडून मिठी मारली, आणि त्याचे पटापट मुके घेतले ! 'अशोक नाहीत – तर निदान त्यांच्या गोजिरवाण्या दौलतीवर तरी प्रेम करूं या ! त्यांचा प्रिय ठेवा वात्सल्याच्या रम्य रसांत बुडवून टाकूं या !' त्या स्वत:शींच पुटपुटल्या.

काळ गजगतीने चालला होता.

अलीकडे गुलाबबाईंना शाळेच्या नोकरीचा कंटाळा आला होता. तीच शाळा – आणि तोच तोच कार्यक्रम – ह्यांची त्यांन्

भारी शिसारी आली होती. आपल्या रुक्ष शालेय जीवनांत कांही तरी ओलावा आणण्यासाठी त्या धडपडत होत्या. निराशेमुळे कडवट झालेल्या स्वतःच्या आयुष्यांत गोडवा निर्माण करण्या-करिता त्यांच्या प्रयत्नांची पराकाष्ठा चालू होती.

केवळ परिस्थितीच्या विरोधामुळे निर्जीव बनलेल्या त्यांच्या जिंदगींत चैतन्य चेतविण्यासाठी — एक दिवस त्यांनी मोठें धाडस केलें.

त्या दिवशीं सायंकाळीं. पूर्वींच्या सरावाप्रमाणे, मधूच्या पाटीवर गुलाबबाईंनी अशोकला चिठ्ठीवजा पत्र लिहिलें.

गुलाबबाईंच्या त्या पत्राला उत्तर पाठविण्याचें अशोकने साहजिकच टाळलें.

त्याने सहजासहजी केलेलें दुर्लक्ष गुलाबबाईंना सहन झालें नाही. मधूच्या पाटीवर त्यांनी पुनः आपल्या ताज्या पत्राची आठवण त्याला करून दिली.

तेव्हा अशोक संतापला.

सौम्य शब्दांत त्याने आपला राग प्रकट केला; त्यांच्या पत्राला उत्तर लिहिण्याचें स्पष्टपणे नाकारलें, आणि थांबलेला पत्रव्यवहार पुन्हा सुरू करण्याच्या त्यांच्या धोरणाबद्दल स्वतःची तीव्र नापसंति दर्शविली.

अशोकची ती निर्दय स्पष्टोक्ति ऐकून गुलाबबाईंना अतिशय वाईट वाटलें. त्यांचें नाजुक स्त्रीहृदय शतशः विदीर्ण झालें !

अशोकच्या कठोर वर्तनाने गुलाबबाईंचें विचारी मन मूढ बनलें. त्यांना कांहीच सुचेनासें झालें.

पत्र लिहावें तर अशोक संतापतात; न लिहावें तर स्वत:चें मन तळमळतें,—ही विचित्र व जीवघेणी परिस्थिति त्यांना असह्य झाली. भावनेंत रमणाऱ्या त्यांच्या उत्कट मनाला मधली अवस्था मानवली नाहीं.

परंतु त्यांच्या हातांत कांहीच नव्हतें.

त्या अगदी असहाय झाल्या.

* * *

# ५

काळ वाऱ्याच्या वेगाने धावत होता.

गेला सबंध आठवडा गुलाबबाईंना फार कष्टाचा गेला.

भीति आणि चिंता – ह्या माणसाच्या दोन कट्ट्या वैरिणींनी त्यांच्या मानसिक स्वास्थ्याचा पुरा ग्रास घेतला होता.

एखादी गोष्ट आपल्या नशिबांत नाही हें निश्चितपणे ठरल्यानंतर, त्याच्याबद्दल वृथा शोक किंवा दुःख करण्यांत काय अर्थ आहे ? गुलाबबाईंनी हाच विचार सूज्ञपणे आपल्या निराश मनाशीं केला. आपल्या हृदयांतील प्रीतीचें साफल्य अशोककडून एवीतेवी होणार नाही,–हें नक्की कळून चुकल्यावर त्याबद्दल अश्रु ढाळीत बसणें शहाणपणाचें नाही, ही गोष्ट गुलाबबाईंच्या चांगली ध्यानांत आली होती. पुष्कळ विचार करून त्यांनी मनाशीं ठरविलें होतें की, पुढे आलेल्या परिस्थितीला धीमेपणाने तोंड द्यायचें. समोर पसरलेल्या अंधारांत

चांचपडायचें नाहीं,—तर विश्वासाने चालण्याचा प्रयत्न करायचा. ईश्वर त्या अंध:कारांत आपल्याला एखादा तरी प्रकाशाचा किरण दाखवील. आणि मग त्या एकाकी किरणाच्या चिमुकल्या उजेडांत आपण आपला मार्ग आक्रमूं ! घडल्या गोष्टींचें दु:ख करायचें नाही, आणि पुढे काय घडेल ह्याचा वृथा दरारा बाळगायचा नाही.

प्रत्येक मनुष्याच्या आयुष्यांत कधी तरी एक वेळ अशी येते की, जेव्हा त्याला अदृश्य शक्तीपुढे हात टेकावे लागतात; ईश्वरी सामर्थ्याला संपूर्णपणे शरण जावें लागतें. त्या वेळेपुढे निमुटपणे मान वाकविण्यांतच माणसाची खरी माणुसकी प्रत्ययाला येते. ईश्वराच्या अफाट ऐश्वर्यापुढे,—माणसाच्या माणुसकीचा तो आविष्कार दुबळा असला तरी अपरिहार्य असतो.

मानवी जीवितांत न चुकतां येणारी ही अवस्था—अभ्यासू वृत्तीच्या बुद्धिमान् गुलाबबाईना केव्हाच उमगली होती. त्याप्रमाणे त्यांनी आपल्या मऊ मनाला मुरड घातली होती; आणि तद्वत् वागायला सुरवातहि केली होती.

तशा रीतीने वागण्यांतच त्या आपल्या मनाचें समाधान करून घेत होत्या.

पण तेंदेखील त्यांच्या नशिबाला पाहवलें नाहीं.

एक जबरदस्त घटना घडली.

त्या घटनेने त्या पुऱ्या हादरून गेल्या.

भीति व चिंता ह्या दोन सर्पिणींनी त्यांच्या हळुवार मनाला कडकडून चावे घेतले.

गेला सबंध आठवडा आणि वर दोन दिवस झाले,—मधु शाळेंत आला नव्हता.

दररोज अकरा वाजतां गुलाबबाई मधूची वेड्यासारखी वाट पाहात. सतत आठ दिवस त्यांची निराशा झाली,—तेव्हा मात्र त्यांचा धीर सुटला. त्यांना भीति वाटूं लागली, 'माझ्या चांडाळणीच्या पायी तर मधूची शाळा बंद झाली नाही? माझ्या प्रेमामुळं तर तो शाळेला आंचवला नाही?—माझ्या पत्रांचा त्रास नको— म्हणून अशोकांनी मधूला दुसऱ्या शाळेंत घातलं असावं! गुलाबबाईंची कटकट कायमची टाळण्यासाठी तर नाही मधूंचं नांव ह्या शाळेंतून काढलं अशोकांनीं?'

मधूच्या आठवडाभराच्या गैरहजेरीमुळे गुलाबबाईंना चिंताहि वाटूं लागली. त्यांचें संशयाने अकारण ग्रस्त झालेलें मन त्यांना सारखें डिवचूं लागलें, 'माझ्या त्रासामुळं शाळा बंद केली नसेल,—तर मग मधु कां बरं येत नाही? बाहेर गावीं तर कुठं गेला नाही तो? काय झालं असावं?—'

गुलाबबाईंनी खूप विचार केला. प्राथमिक शाळेचा कायदा अकस्मात् त्यांच्या मदतीला धावून आला! मधूची चौकशी करण्यासाठी शाळेच्या रंगू मोलकरणीला त्यांनी अशोकच्या घरीं पाठविलें.

गुलाबबाई रंगूच्या वाटेकडे डोळे लावून बसल्या होत्या. मधु महाजन शाळेंत कां येत नाही—हें गूढ कोडें कसें उकलावें म्हणून त्या अगदी उतावीळ झाल्या होत्या.

दहाच मिनिटांत रंगू अशोकच्या फणसवाडींतील खोलीवरून परतली. तिच्या तोंडचे शब्द ऐकण्यासाठी बाईंचे कान अतिशय

उत्सुक झाले होते. पहिलीच्या वर्गांतून बाहेर पडून त्यांनी रंगूला सोप्यांतच गाठलें. खालच्या आवाजांत त्यांनी तिला विचारलें,

" काय ग ? कां नाही शाळेंत येत मधु ? काय झालं ? "

" लई वंगाळ !—" रंगूला फार वाईट वाटलेलें दिसलें. तसें गुलाबबाईच्या मनांत चर्रर झालें ! त्यांनी घाबरून भीत भीत पृच्छा केली,

" कां—काय झालं ? "

" अवो, पोरगा तापानं फूं हून पडलाय ! आज धा दिस जालं ! अजूनशान उतारा नाय !—मरी आय करो—आन् प्वाराचा ताव ब्रिर्गाबिगी उतरो ! " रंगूने हातांचीं बोटें आपल्या कानशिलांवर मोडलीं.

मधूचा ताप दहा दिवसांत उतरला नाही. त्याच्यासारख्या कोवळ्या मुलाला विषम झाला हें ऐकून गुलाबबाईच्या छातींत धस्स झालें ! त्यांनी रंगूपाशी आणखी चौकशी केली,—

" मधूचे वडील आहेत ना त्याच्याच जवळ ? "

" अवो बाई, त्येंचं तर हाल पुसूं नका ! त्येंचाकडं पघवत बी नाय ! लई ऽऽ कळा जाली बिचाऱ्याची !—त्या दोघांवर अवकळाच आलिया जनु ! "

रंगूच्या तोंडचे शब्द ऐकून गुलाबबाईना अतिशय वाईट वाटलें. नाही तरी आज सकाळीं उठल्यापासूनच त्यांच्या मनाला कसली तरी रुखरुख वाटत होती. भावी अशुभ गोष्टींची अचूक सूचना कधी कधी अकस्मात् माणसाला मिळते.—

बाईचें तसेंच झालें. पहांटे जाग आल्यावर, अस्ताव्यस्त झालेला अंगावरील पदर सारखा करीत असतांनाच, त्यांच्या मनाला अचानकपणे कल्पना शिवून गेली, ' अशोक कांही संकटांत तर नाहीत ना ? ' आणि काय विचित्र योगायोग ! आता दुपारीं रंगूने अशोकवरील भयंकर संकटाची क्रूर बातमी आणली होती.

मधूचा विषमाचा आजार, आणि त्यामुळे अशोकची झालेली स्थिति रंगूकडून समजल्यावर गुलाबबाई अन्तर्बाह्य हादरून गेल्या.

गुबगुबीत, गोजिरवाणा मधु तापाने क्षीण होऊन बिछान्यावर पडल्याचें करुण चित्र नजरेपुढे आलें, — तेव्हा गुलाबबाईचें हृदय द्रवलें. उशाशीं बसून मधूची सेवा करीत असलेला असहाय्य अशोक, अंतश्चक्षूसमोर उभा राहिला, — तशा त्या अगदीं कळवळून गेल्या.

हेडमास्तरीणबाईकडे जाऊन त्यांनी अर्ध्या दिवसाची रजा काढली. त्या तडक घरीं गेल्या. स्वत: खोलींत पाऊल ठेवल्याबरोबर त्यांनी झटकन् दार लावून घेतलें. त्यांना रडूं आवरेनासें झालें. स्वत:चें मन हलकें करण्यासाठी त्या मनसोक्त रडल्या. कारण त्यांची अशोकवरील भावनाच तशी निस्सीम होती ! ज्यांच्याविषयीं आपल्या अंत:करणांत निरतिशय प्रीति वसत आहे, ते अशोक संकटांत आहेत—हें पाहून गुलाबबाईचा ऊर दुभंगून गेला. त्यांनी खूप विचार केला; परंतु त्यांना कांही सुचेना ' अशोक तिकडे संकटाशी सामना देत असतांना आपण इथं स्वस्थ बसून आहोंत ' ह्याबद्दल त्यांची त्यांनाच खंत वाटली.

—पण नाही तरी त्या काय करणार होत्या ?

मधूच्या समाचारासाठी व अशोकला मदत करण्याकरितां त्या त्याच्या फणसवाडींतील खोलीवर गेल्या, तर अशोकला तें कधींच आवडणार नाही. बरें, न जातां येथेच बसून राहिल्या तर स्वतःच्या मनाची तळमळ. अशा दुधारी कात्रींत त्या सापडल्या होत्या.

अखेर शेवटी त्यांनी स्वतःशी निर्णय घेतला.

पायांत चपला सरकवून त्या खोलीच्या बाहेर पडल्या; आणि बंगल्याचें फाटक उघडून झपाझप चालूं लागल्या. फणसवाडींत शिरल्या तशीं त्यांचीं पावलें एकमेकांत घोटाळूं लागलीं. लटपटत्या पायांनी त्या अशोकच्या तळमजल्यावरील खोलीपाशी येऊन उभ्या राहिल्या. आता त्यांचें सगळें अंग लटलट कापूं लागलें. मन अतिशय भिऊन गेलें. स्वतःचें कंपायमान शरीर सावरीत, आणि घाबरून भांबावलेलें मन दडपीत — त्यांनी कडी वाजवली.

दार उघडलें.

उंबऱ्याशी अशोक दीनवाणा उभा होता.

गुलाबबाईनी वर मान केली.

दोघांची नजरानजर झाली.

गुलाबबाईची बावरलेली, कंपित नजर —आणि अशोकची असहाय्य, दुःखी दृष्टि फारा दिवसांनी एकमेकांना बिचकत बिचकत भेटल्या.

अशोकची करुण अवस्था प्रत्यक्ष पाहिल्यानंतर,—गुलाबबाईच्या डोळ्यांतील भीति जाऊन निमिषार्धात तेथे सहानुभूति

अवतरली. डोळे भरून एकदा त्यांनी त्याच्याकडे पाहिलें. बिचकत पण उतावळेपणाने त्या उद्गारल्या,

" मधूला भेटायला आलेंय मी ! "

पदराशी चाळा करीत, झटकन् अशोकच्या अंगावरून त्या पुढे सरकल्या, आणि मधूच्या अंथरुणापाशी गेल्या.

मधूचा कृश झालेला इवलासा देह मळलेल्या गादीवर पडु - लेला होता. त्याचे खोल गेलेले डोळे आढयाला खिळले होते.

गुलाबबाईंनी जवळ जाऊन मधूचें म्लान मुख कुरवाळलें, त्याच्या आजारी अंगावरून प्रेमाने हात फिरविला, आणि त्याच्या झुपकेदार परंतु आता वाखेसारख्या झालेल्या केसांना नाजुकपणे गोंजारलें.

गुलाबबाईच्या स्पर्शातील मार्दव व हळुवारपणा पाहून, चिमण्या मधूला देवाघरीं गेलेल्या आपल्या प्रेमळ आईची आठ-वण झाली असावी ! त्याचे डोळे टच्‌कन् पाण्याने भरून आले. खाली वाकलेल्या गुलाबबाईच्या मानेला आवेगाने मिठी मारून तो हमसून रडूं लागला. बाईंनी त्याचें सान्त्वन करण्याचा प्रयत्न केला मधूचा भावनावेग ओसरल्यावर त्याच्या कपाळाचें चुंबन घेत त्यांनी म्हटलें—

" लवकर बरं वाटेल हं आता आमच्या मधुबाळाला !— मग आमचा मधुबाळ शाळेंत येणार ! मी त्याला केशरी रंगाचं आइसफ्रट देणार ! पोपटाची कविता शिकविणार ! राणीच्या बागेंत ट्रिपला नेणार ! आणि तिथं खूप खूप मजा करणार हं आपण—"

" बाई – बाई, माझ्या आईलासुद्धा नेऊं या का आपण राणीच्या बागेंत ? मी फार आजारी आहे म्हणून ती देवाच्या घरून येणार आहे मला भेटायला ! बाबांनी तिला केव्हाच पत्र पाठविलंय !––पण – पण अजून कशी आली नाही आई ?–– मी इतका आजारी––! तरी मीं बाबांना सांगितलं होतं, तिला लवकर बोलवा.––बाई, तुम्ही लिहा ना माझ्या आईला पत्र. म्हणजे ती––"

गुलाबबाईंनी त्याच्या तोंडावर हात ठेवून त्याला चूप करीत म्हटलें,––

" लिहितें हं, आत्तां लिहून टाकतें––"

पाठीमागे सरकत त्याच्या अंथरुणावर त्या नीटपणे बसल्या.

आता त्यांची दृष्टि सहज खोलीमध्ये फिरूं लागली. आज प्रथमच त्या अशोकच्या खोलींत आल्या होत्या. खोली चित्र-काराची असली तरी गंभीर आजाराने तिला ओंगळ स्वरूप आलें होतें. मधूच्या विस्कटलेल्या मळकट बिछान्याच्या जवळच अशोकचा चित्रफलक, लहानमोठे कुंचले, आणि नाना तऱ्हेचें रंगसाहित्य अस्ताव्यस्त पडलेलें होतें. पलीकडल्या बाजूला बैठ्या डेस्कच्या भोवती चारदोन जाडजूड जुनीं पुस्तकें, कांहीं अमेरिकन मासिकें, आणि बरींचशीं शिळीं इंग्रजी वर्तमानपत्रें इतस्तत: विखुरलेलीं होतीं. भिंतीला खुंटाळ्यावर अशोकचे वापरलेले कपडे धूळ खात लोंबकळत होते. अगदी दूरच्या कोपऱ्यामध्ये जुना स्टोव्ह, मोडकी लोखंडी शेगडी, आणि स्वयंपाकाचें इतर सामान वाटेल तसें लोळत होतें. मधूच्या पायथ्याशी असलेल्या रिकाम्या जागेंत बुद्ध व हिटलर ह्यांचे

अर्धपुतळे जळमटाच्या मच्छरदाणींत बसून विसांवा घेत होते. बैठ्या डेस्कच्या समोरील भिंतीवर अशोकच्या कुंचल्यांतून उतरलेली उन्मत्त उर्वशी बेभानपणे नृत्य करीत होती. उर्वशीच्या उन्मादकारक चित्रांतील रमणीय कलाविलास पाहून गुलाबबाईंचें उदास असलेलें मन किंचित् उमलल्यासारखें झालें. इतका वेळ स्वैर संचार करीत असलेली त्यांची नजर आता नजिकच उभ्या असलेल्या अशोकवर गेली. उर्वशीच्या उन्मत्त व विलासी चित्राचा निर्माता उदास व विफल झालेला त्यांना दिसला! अशोकच्या अंगावरील कपडे साधारण मळलेलेच होते. केस विंचरलेले नव्हते. तो खूप अशक्त झाला होता. त्याच्या ओढलेल्या चेहऱ्यावर दाढी वाढलेली होती. जागरणाने डोळे जले होते. हात, पाय, तोंड – त्याचें सारें शरीरच कमालीचें थकलेलें होतें. त्याच्या दु:खित चेहऱ्यावरील असहाय्य व केविलवाणे भाव सहन न होऊन गुलाबबाईंचे डोळे एकदम डबडबले!

अशोकच्या दृष्टींतून तें निसटलें नाही.

गुलाबबाईंची ओली नजर—आणि अशोकची सुकलेली दृष्टि—ह्यांची पुन्हा एकदा भेट झाली.

ह्या कठीण प्रसंगीं आपण अशोकना धीर द्यायला पाहिजे. आपले अश्रु त्यांना दिसतां कामा नयेत, हा विचार मनांत येऊन बाईंनी आपली पाझरती नजर झरॅकन् दुसरीकडे वळविली.

शेजारच्या घड्याळांत सहाचे ठोके पडले, तसा अशोक मधूसाठीं मोसंब्रीचा रस काढूं लागला. गुलाबबाईंनी उठून त्याच्या हातांतील मोसंबी व सुरी घेतली,—आणि स्वत: रस

तयार केला. बाईंच्या हातून चमच्याने रस पीत असतां, मधु अशोककडे हात करीत अशक्त आवाजांत म्हणाला,—

" बाई, सगळा रस मला नका पाजूं ! फुलपात्रांत थोडासा ठेवा. बाबांनी दोन दिवसांत कांही खाल्लेलं नाही ! त्यांना द्या तो !—"

अजाण मधूचे ते बोबडे बोल ऐकून अशोकचे डोळे तरारून आले ! आपलीं आंसवें लपविण्यासाठी तो पटकन् दार उघडून खोलीच्या बाहेर गेला. तेव्हा मधु परत सांगूं लागला—

"—माझ्यापाशी सारखं बसावं लागतं ना,—मग वेळच मिळत नाही त्यांना सैपाक करायला. तेव्हा—"

गुलाबबाईनी मधूला गप्प केलें.

त्याच्या चार शब्दांत त्यांना अशोकची सारी परिस्थिति समजली होती.

रस पाजून झाल्यावर त्या उठल्या, मधूचा निरोप घेऊन त्या बाहेर आल्या.

दारापाशी अशोक अश्रु ढाळीत उभा होता.

त्याच्या डोळ्यांतून ओघळणारी आंसवांची माळ बघून — बाईंच्या पोटांत कालवाकालव झाली ! त्या थबकल्या, आणि स्वत:चें दु:ख झांकीत बोलल्या,

" धीर धरा ! बरा होईल मधु !—जातें मी ! "

पायऱ्या उतरून त्या झपझप निघून गेल्या.

... ६८ ...

तासाभराच्या आंत गुलाबबाई परत आलेल्या पाहून, मधू-पाशी बसलेल्या अशोकला आश्चर्य वाटलें ! तो विस्मयाने त्यांच्या-कडे पहातच राहिला !

आता बाईंची वेषभूषा अजिबात बदललेली होती. केशरी रंगाचें जॉर्जेटचें पातळ जाऊन त्या ठिकाणीं वायलची शुभ्र साडी आली होती. हातांतील सोन्याच्या कंकणांची जागा काचेच्या साध्या बांगड्यांनी घेतली होती. इतरहि सगळा साज जाऊन तेथे निव्वळ गरज उरली होती. त्यांच्या एका हातांत जेवणाचा डबा असून, दुसऱ्यांत नेहमीच्या प्लॅस्टिकच्या पर्स-ऐवजी बर्फाची रबरी पिशवी होती !

श्रीमंतीचा नखरा जाऊन—सुंदर सेवावृत्ति त्याच्या खोलींत पुन्हा अवतरली होती !

घाईघाईने त्यांनी स्वयंपाकाचा कोपरा झाडला, आणि अशोकचें ताट वाढलें.

मधूच्या बिछान्यापाशी येऊन त्या हलकेच म्हणाल्या,

" बाळ, बाबांना सांग—की पान वाढलंय. खूप आग्रह कर तूं त्यांना जेवायचा ! "

गुलाबबाईंची शालीनता आणि अशोकचा स्वाभिमान !

शालीनता हें जगांतील अत्यंत प्रभावी असें धारदार शस्त्र आहे. परत तें सुंदरहि आहे. त्या सुंदर शस्त्रासमोर मी मी म्हणणाऱ्या वृत्ति आणि व्यक्ति ह्यांनी माना वाकविलेल्या आहेत !

अशोकचें तसेंच झालें !

गुलाबबाईंच्या रम्य शालीनतेपुढे त्याचा स्वाभिमान पार विरघळून गेला.

' स्त्रीची प्रीति सदोदित स्वार्थाने लडबडलेली असते,' ह्या त्याच्या जुन्या अनुभवाला पहिला तडा गेला !

हातपाय धुवून तो पाटावर जाऊन बसला.

त्याचें जेवण झाल्यावर गुलाबबाईंनी मधूला सांगितलें,

" बाबांना म्हणावं, आता तुम्ही झोपा. – जागरणानं त्यांचे डोळे सुजले आहेत. – आज मी इथं रहाणार आहें. सारी रात्र डोळ्यांत तेल घालून तुझ्यापाशी बसणार आहें. तेव्हा त्यांना म्हणावं – तुम्ही निर्धास्तपणं निजा."

मधूच्या सांगण्याने अशोक झोपायला तयार होईना. तेव्हा स्वत: गुलाबबाईंनी त्याला निजण्यासाठी विनविलें.

' प्रमदेचें प्रेम नेहमीच स्वार्थी भावनेने बरबटलेलें नसतें; एवढेंच नव्हे, तर तें कधी कधी सेवावृत्तीने नटलेलेंहि असतें ' ह्याची नवी साक्ष त्याला हळूहळू पटूं लागली होती.

बिछाना पसरून तो पडला. उण्यापुऱ्या दहा दिवसांनी आज त्याला शान्तपणे निजायला मिळत होतें. क्षणांत त्याला गाढ झोप लागली.

कांहीं वेळाने मधूहि गुंगला.

गुलाबबाई मात्र त्याच्या आजारी अंथरुणापाशी जागत बसल्या.

निरलस सेवावृत्ति त्यांच्या रक्तांतच होती. केवळ प्रीतीची तपश्चर्या म्हणून त्या ती करीत नव्हत्या.

नंतरच्या तीन रात्री त्यांनी अशाच जागून काढल्या.

विषमाचा आजार विश्वासघातकी आणि धोक्याचा !

रात्रीं गुलाबबाई – आणि दिवसा अशोक—असा जागता पहारा त्या दोघांनी मधूवर ठेवला.

चौदावा दिवस उजाडला !

तो दिवस – आणि त्यांतल्या त्यांत चौदावी रात्र अतिशय धोक्याची आहे असें डॉक्टरांनी सांगितलें होतें.

ताप बेसुमार चढल्यामुळे दुपारींच मधूची शुद्ध गेल्यासारखें झालें. बेछूटपणे वाढलेल्या तापामध्ये तो बरळूं लागला.

अशोक व गुलाबबाई ह्यांनी सबंध दिवस त्याच्या उशापायथ्याशी बसून काढला.

दिवस कसा तरी पार पडला !

रात्र झाली !

—ती भयानक रात्र सुरू झाली !

अशोक घाबरून गेला. ' मधु आज मला सोडून जाणार काय ? ' ह्या एकाच प्रश्नाच्या धर्गीने त्याची चर्या वाळून कोळ झाली होती !

दहा वाजले.

धावणारे क्षण आता हळूहळू चालूं लागले.

घटकेने गजाची गति घेतली.

प्रहर रेड्यासारखा एकाच ठिकाणीं हटून बसला.

कांही वेळाने काळच थांबल्यासारखा झाला.

शेजारच्या घड्याळांत साडेअकराचा ठोका पडला.

मध्यरात्र सुरू झाली !

डॉक्टरांचे शब्द अशोकच्या कानांत प्रचंड आवाजाने घुमूं लागले – 'मध्यरात्र उलटली की मधु हातीं लागला ! तेवढा मध्यरात्रीचा शेवटचा क्षण संभाळा ! – मध्यरात्र ! – शेवटचा क्षण ! !'

ती मध्यरात्र आली होती !

तो शेवटचा क्षण थोड्याच वेळांत येणार होता !

अशोक बावरला, भांबावला, घाबरून गेला !

गुलाबबाईच्या हातांतलें घड्याळ त्याने मागून घेतलें. उजव्या हातांत मधूची नाडी आणि डाव्या हातामध्ये घड्याळ घेऊन तो बसला.

त्याची भेदरलेली नजर आता घड्याळांतील सेकंद-काट्यावर खिळून राहिली.

एरवीं वेगाने धावणारा तो सेकंद-काटा आता अगदी मंद गतीने चालला आहे असें त्याला वाटलें.

मधूचा ताप एकशेसहा झाला.

मिनिटा-मिनिटाला तो चढत होता.

वेगाने वाढत असलेल्या तापाचा मेंदूवर परिणाम होऊं नये, म्हणून गुलाबबाई त्याच्या कढत कपाळावर बर्फ धरून बसल्या होत्या.

मधूची शुद्ध केव्हाच गेली होती.

घड्याळांत पावणेबारा झाले.

आता अशोक जास्त घाबरला !

ताप साडेसहा झाला.

शेवटचा आणीबाणीचा क्षण जवळ येऊं लागला !

घड्याळाचे काटे आणखी मंदावले !

काळ निश्चल झाला !

इतका वेळ घड्याळांत सेकंदकाट्याच्या रूपाने धावणारा काळ रेड्यावर स्वार होऊन आपल्या दारांत येऊन उभा राहिला आहे, – अशी भीति अशोकला वाटूं लागली.

डॉक्टरांनी सांगितलेला शेवटचा क्षण तो हाच काय, – अशी भेसुर शंका त्याच्या मनाला शिवली !

त्याच्या डोळ्यांतून घळाघळा अश्रु ओघळूं लागले. आतापर्यंत दाबून ठेवलेले हुंदके बाहेर पडले. त्याला रडें आवरेनासे झालें, तेव्हा बिछान्यावर पलिकडे बसलेल्या गुलाबबाई त्याच्याजवळ आल्या. त्याच्या खांद्यांवर आपले दोन्ही हात ठेवीत, – त्यांनी त्याला शान्त करण्याचा प्रयत्न केला. मायेचा स्पर्श झाल्याबरोबर अशोकला जास्तच उचंबळून आलें. तो रडूं लागला, – तेव्हा बाईनी त्याच्या पाठीवरून प्रेमाने हात फिरविला आणि म्हटलें, —

" असं काय करतां, अशोक ? धीर धरा ! – प्रसंग आणीबाणीचा आहे ! असं हताश होऊन कसं चालेल ? – भिऊं नका ! आल्या क्षणाला धैर्यानं तोंड देऊं या ! असे घाबरूं नका ! मी तुमच्या शेजारीं अक्षय उभी आहें ! – तुमच्या-बरोबरच माझीहि आजपर्यंतची पुण्याई मी पणाला लावतें ! दोघांच्या पुण्याईनं मधूवरलं संकट नक्की टळेल ! "

रडत असतांनाहि अशोकची दृष्टि घड्याळावरून ढळली नव्हती. गुलाबबाईंचें लक्षहि मिनिटकाट्यावर होतें.

अकरा वाजून पंचावन्न मिनिटें झालीं होतीं.

अवघ्या पांच मिनिटांनी मध्यरात्र उलटणार होती.

शेवटचा क्षण जवळजवळ येत होता.

मधूच्या अंगांतला विषारी ताप सातापर्यंत पोहोचला होता. अजून त्याची चढती कमानच होती.

बाराला दोन मिनिटें राहिलीं !

ताप थोडा थोडा चढतच होता !

शेवटच्या क्षणाला एक मिनिट उरलें !

अशोक रडायचा थांबला. गुलाबबाईंनी आपले हुंदके आंतले आंत दाबले.

खोलीमध्ये एकदम भयानक शान्तता पसरली !

मधु अजूनहि बेशुद्धच होता !

त्याचा ताप वाढतच होता !

फक्त पांचच सेकंद ! – आणि मग शेवटचा क्षण !

' ठण् ! ठण् ! ठण् !—' शेजारच्या घड्याळांत बाराचे ठोके पडूं लागले !

शेवटचा क्षण येऊन ठेपला !

अशोकचे डोळे विस्फारले !

गुलाबबाईंचा श्वास कोंडला !

न टळणारा शेवटचा क्षण जसा आला–तसा निघून गेला.!

—मधूचा ताप वाढायचा थांबला !

चढती कमान स्थिरावली !

दुसऱ्याच क्षणीं मधूचा ताप उतरूं लागला !

—मधु विषमांतून वांचला !

त्याचा काळ आला होता, – पण वेळ आली नव्हती ! !

त्याच्या प्राणावरचें संकट टळलें होतें !

अशोकला हायसें वाटलें !

गुलाबबाईंना आनंद झाला !

मधूचा ताप सावकाश उतरूं लागला, तेंव्हा अशोकला फार हर्ष झाला. हर्षातिशयानें त्याला रडूं आलें !

आता तो मुक्तकंठाने रडूं लागला.

आताचें अशोकचें रडणें हर्षाच्या पोटीं आहे – हें माहीत असूनसुद्धा गुलाबबाईंना तें सहन झालें नाहीं. त्यांनी त्याचें सान्त्वन करण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न केला.

* * *

## ६

आता मधूची प्रकृति चांगली सुधारली होती.

विषमाच्या आजारानंतर त्याच्या अंगामध्ये आलेली अशक्तता घालविण्यासाठी अशोक व गुलाबबाई या दोघांनीहि पुष्कळ परिश्रम घेतले.

नाही तरी विषमाचें वैशिष्ट्यच आहे तें.

हा ताप अंगांत असतांना जितकी काळजी घ्यावी लागते तितकीच – किंबहुना जास्त चिंता तो उतरल्यानंतर वाहावी लागते !

त्यांत परत मधु म्हणजे नाजुक, कोवळें फळ.

चौदा दिवसांच्या प्रखर, विषारी तापानंतर पांच वर्षांचा लहानगा मधु म्हणजे एक हाडांचा सापळा बनला होता. त्या

रक्तहीन सापळ्यांत नवा जीव ओतण्याकरिता दोघांनींहि खूप कष्ट केले.

अनेक आठवडे पोटांत अन्न गेलें नसल्यामुळे मधूला फार भूक लागे. तो कळवळून रडायचा, आणि भात-पोळीचा हट्ट करायचा. अशा प्रकारचें अन्न इतक्यांत पोटांत गेल्यास ताप उलटण्याची जबर भीति होती. बरें, न द्यावें तर त्याची केविलवाणी स्थिति पाहवत नसे. अशा विलक्षण कठीण अवस्थेंत अशोक सापडला म्हणजे गुलाबबाई पुढे होत, मधूची समजूत घालण्याचा आटो-काट प्रयत्न करीत; आणि त्याने नच ऐकलें तर कठोरपणे त्याला तसाच रडत ठेवीत, परंतु अन्न देत नसत. कारण बाईंचा स्वत:चा ह्या बाबतींतला अनुभव फार भयंकर होता ! अशाच भावनेच्या विवशतेंत चूक घडल्यामुळे त्यांच्या पाठीला खळगा पडलेला होता. त्यांच्या धाकट्या भावाचा विषमाचा उतरलेला ताप, — अवेळीं अन्न खाल्ल्यामुळे पुन्हा उलटून त्यांत तो वारला होता. तेव्हा मधूच्या पथ्यपाण्याच्या बाबतींत त्या कटाक्षाने आणि थोड्याशा निर्दयपणे वागत. पूर्वीप्रमाणेच त्या दोघांनी त्याच्यावर रात्रंदिवस जागता पहारा ठेवला. अशोकचें वात्सल्य — आणि गुलाबबाईंची ममता — ह्यांच्या सतत शान्त शिडकाव्याने मधु अपेक्षेपेक्षा जास्त लवकर बरा झाला. खोलीं-तल्या खोलींत तो हिंडूं फिरूं लागला, तेव्हा गुलाबबाई सहज एक दिवस अशोकला म्हणाल्या,

“ आता मधुबाळाला महाबळेश्वर किंवा माथेरानला न्यायला पाहिजे. म्हणजे त्याची गेलेली शक्ति झपाट्याने भरून येईल.”

" खरं आहे ! पण आम्हा गरिबांचं माथेरान – महाबळेश्वर आमच्या टिचभर खोलीच्या खुराड्यांतच असतं.— गरीबांना थंड हवेपेक्षां कढत अन्नाची जास्त गरज असते." अशोकच्या आवाजांतील सूक्ष्म कडवटपणा पाहून स्वत:ची चूक गुलाबबाईच्या ध्यानांत आली. ' नको होतं तें बोलून गेलें. मग आतां पुरतेपणीं तरी बोलूं या ' ह्या विचाराने भीतभीतच त्यांनी म्हटलें,

" मी घेऊन जातें मधूला महाबळेश्वरला. .... माझ्याबरोबर पाठवायला काय हरकत आहे ? "

" बाई, क्षमा करा मला ! तुम्हांला पावलोपावलीं दुखविणंच माझ्या नशिबीं दिसतंय ! – मला तुम्ही कृतघ्नदेखील म्हणाल. मधूसाठीं तुम्हीं जें जें कांही केलंत त्याबद्दल मी तुमचा अतिशय कृतज्ञ आहें; ' —'पण' —'पण तुम्हीं तरी गरीबाला डागण्या बसतील असं कां बोलतां ? स्वाभिमानाचा सारा मक्ता कांहीं श्रीमंतांनाच दिलेला नसतो ! गरीबाच्या नि:शक्त, पोकळ छाताडांतसुद्धां उबाऱ्याला अभिमान असतो ! "

" असा गैरसमज काय करून घेतां ? असं वाकड्या अर्थानं मी आपल्याला कसं बोलेन ? — केवळ राहवत नाही म्हणून पुन्हा एकदा विनंति करतें —निदान माझ्या घरीं तरी त्याला पाठवा. आईच्या मायेनं अन् ममतेनं मी त्याचं सारं करीन ! " गुलाबबाईच्या आवाजांत भावनेचा कंप होता. तो अशोकला जाणवला. त्याच्या भावनाप्रवण मनांत चलबिचल झाली. तो क्षणमात्र अडखळला.–पण नंतर स्वत:च्या दुबळ्या मनाला सावरीत तो उद्गारला,

" गुलाबबाई, माझा मधु खरोखरीच धन्य आहे ! तुमच्या सारख्याचा जीव त्याच्यासाठी तुटतो—"

" धन्य मधु नव्हे – मी आहें ! त्याच्यासारखा गोड, गोजिरवाणा मुलगा ममता सांडायला मला मिळाला हें माझंच भाग्य होय !— मग पाठवतां का त्याला ? मी घेऊन जातें आमच्या घरीं. पंधरा दिवसांत त्याला पूर्वीसारखा गुटगुटीत करून आणतें ! "

" फार आभारी आहें तुमचा ! " अशोक गोंधळून गेला. त्याला कांही सुचेना. वारंवार गुलाबबाईंचें मन मोडणें आणि पुन: पुन्हा त्यांना दु:ख देणें त्याच्या अगदी जिवावर आलें होतें. वेळ मारून नेण्यासाठी कांही तरी बोलायचें म्हणून तो सुचेल तें बोलूं लागला, " मधूच्या बाई, मला तुमची भावना समजत का नाही ? पण........जग काय म्हणेल ? मधु तुमच्या घरीं येऊन राहिला तर नादान जग नाही नाही तें बडबडेल. त्याच्या तोंडावर कुणी अन् कसा हात ठेवायचा ?— तेंव्हा तुम्हीच असं करा, आजपर्यंत आमच्याकडे आलांत-- तसाच आणखी थोडे दिवस त्रास घ्या;—मी तुमचे उपकार कधींहि विसरणार नाही ! "

अशोकच्या विनंतीनुसार गुलाबबाईंचा जवळजवळ सगळा दिवस मधूसाठी त्याच्या खोलीवर जाऊं लागला. मधु झपाट्याने सुधारूं लागल्यामुळे, पूर्वीचें आजारांतील कारुण्य जाऊन आता खोलीमध्ये आनंदी वातावरण पसरूं लागलें होतें.

आजारीपणांत व नंतरच्या दोनतीन आठवड्यांत गुलाबबाईंनी मधूची अंग मोडून, सेवा-शुश्रूषा केली होती. त्याला अहोरात्र

फुलासारखा झेलला होता. त्यामुळे चिमण्या मधूच्या चिमुकल्या मनामध्ये बाईंच्याविषयी अकृत्रिम जिव्हाळा निर्माण झाला होता. पहिल्यापासून त्याला त्यांची विलक्षण ओढ वांटायची. आता ओढीच्या जोडीला जिव्हाळा येऊन बसला होता. ओढ व जिव्हाळा – ह्या दोन गूढ शक्तींचें मनोज्ञ मिश्रण होऊन, आज मधूला गुलाबबाईंच्याविषयी जबरदस्त आकर्षण वाटूं लागलें होतें. बाई त्याला आईसारख्या वाटूं लागल्या होत्या.

मधूच्या आजाराच्या निमित्ताने गुलाबबाईंना अशोकच्या अगदी निकट जाण्याची संधि मिळाली होती. मधुबाळाचा विषमाचा आजार म्हणजे आपल्याला अशोकबद्दल वाटणाऱ्या भावनेची कसोटीच होय असें त्यांना वाटलें. अशा कसोटीच्या समयाची त्या वाटच पहात होत्या. कारण त्याशिवाय भावनेची खरी पारख होणें अशक्य असतें, हें त्या पुरतेपणीं जाणून होत्या. अशोकसंबंधी हृदयांत वसत असलेल्या भावनेचें सत्य स्वरूप प्रकट करण्यासाठी हा क्षण सुंदर आहे, – ह्या ईर्षेनेच त्यांनी त्या प्रसंगांत उडी घेतली होती. स्वतःच्या मगदुराप्रमाणे त्यांनी आपलें कर्तव्य पार पाडण्याचा प्रयत्नहि केला होता. आणि त्या कठीण सत्त्वपरीक्षेंत आज त्या उजळपणे उत्तीर्ण झाल्या होत्या.

त्या सत्त्वपरीक्षेंतील स्वतःच्या यशाबद्दल फक्त गुलाबबाईंनाच खात्री वाटत होती असें नव्हे, तर अशोकलादेखील त्यांचें तें यश पाहून एक प्रकारचा विश्वास वाटूं लागला होता. बाईंनी मधूची निरलस वृत्तीने जी सेवा व शुश्रूषा केली, त्याचा अशोकवर अनुकूल परिणाम झाला होता. आज पाचसहा

आठवडे झाले, – तीं दोघेंजणें एकाच खोलींत, अगदी जवळ जवळ वावरत होतीं. पण त्या संधीचा गुलाबबाईंनीं दुरुपयोग केला नव्हता. त्या सबंध अवधीमध्ये त्यांनी एकदासुद्धा आपल्या प्रीतीचा वा प्रेमपत्रांचा उल्लेख किंवा उच्चार केला नाही. प्रेमामध्ये झालेल्या स्वत:च्या निराशेबद्दल त्यांनी चकार शब्ददेखील काढला नाही. स्वत:ची हृदयस्थ भावना पुन्हा प्रकट करण्याचा त्यांनी थोडाहि प्रयत्न केला नाही. अशोकच्या असहाय स्थितीचा गैरफायदा त्यांना घेता आला असता, परतु त्यांनी तसें अजिबात केलें नव्हतें ह्या सर्व घटनांचा अशोकच्या सरळ व सखोल मनावर अतिशय परिणाम झाला होता. तो स्वत:शींच उद्गारला होता, ' एखादी उथळ स्त्री असती तर तिनं अशा संकटाचा उपयोग करून आपल्या प्रेमाचं प्रदर्शन करण्याचा आचरटपणा केला असता, अन् मला विचित्र पेंचांत टाकलं असतं. पण नाही ! मधूच्या बाई उथळ नाहीत ! त्या भारदस्त आहेत ! त्यांचा स्वभाव सखोल आहे ! सुंदर शालीनतेमुळे त्यांच्या स्त्रीत्वाचा नाजुक आविष्कार भारी रमणीय वाटतो !'

गुलाबबाईंच्या त्याच्यावरील प्रीतीविषयी नुसता विश्वासच नव्हे, तर दृढ स्वरूपाचा मोह आता अशोकला वाटायला लागला होता.

तापाच्या शेवटच्या रात्रीं – अगदी अखेरच्या क्षणाला, मधुबाळाचा प्राण वांचावा म्हणून बाईंनी स्वत:ची सारी पुण्याई पणाला लावली होती, – हें आठवून अशोकला स्वाभाविकच अतिशय आनंद होई. त्यांच्या विशुद्ध प्रीतीबद्दल त्याला अभिमान वाटे.

गुलाबबाईच्या हृदयांत उद्भवलेल्या ज्या प्रीतीचा मागे आपण अस्वीकार केला होता, तीच प्रीतीची भावना आज आपल्याला आदरणीय, अभिमानास्पद, आकर्षक वाटूं लागली आहे,- ह्या विशेष घटनेचा अशोकने आपल्या मनाशीं खूप विचार केला. ज्या वेळीं त्या भावनेचा स्वीकार करण्याचें त्याने नाकारलें होतें त्या वेळीं असलेले स्वतःचे विचार त्याने पुनः पुन्हा तपासून पाहिले. तेव्हाचे त्याचे विचार आजच्याप्रमाणेच खऱ्याखुऱ्या अनुभवांवर आधारलेले होते. त्या वेळचा त्याचा भीषण अनुभव आणि आजचा अगदीं भिन्न स्वरूपाचा अनुभव- ह्यांमध्ये जमीन-अस्मानाचें अंतर होतें. ज्यामुळे गुलाबबाईचें प्रेम प्रथम त्याला अस्वीकार्य वाटलें तो अनुभवच मुळीं भयंकर व उत्साहभंग करणारा होता. आज नव्याने आलेला अनुभव त्या मानाने किती तरी सहाय्यक व उत्तेजक असा होता. दोन्ही अनुभवांमध्ये केवढी तरी तफावत होती. साहजिक तेवढीच तफावत अशोकच्या दोनहि वेळच्या विचारांत पडणें अटळ होतें. तेव्हाचे आणि आताचे विचार ह्यांमध्ये पडलेला फरक पाहून त्याला विस्मय वाटला. परंतु त्याचाहि इलाज नव्हता. गुलाबबाईची प्रीतीची तपश्चर्या, तीमध्ये दिसून आलेला त्यांचा त्याग, आणि अनुभवाला आलेलें त्यांचें मनौदार्य—सारेंच श्रेष्ठ होतें. ह्या सगळ्या श्रेष्ठ गोष्टींपुढे, — अशोकला सतावीत आलेला व्यवहार, आणि त्या व्यवहाराच्या पोटीं जन्मलेला त्याचा नकार अगदीं थिटा पडला. मागे त्याने आपला नकार प्रदर्शित केला तेव्हा गुलाबबाईच्या प्रेमाच्या उत्कटतेचा अंदाज त्याला लागलेला नव्हता. परंतु मधूच्या आजाराच्या निमित्तानें त्या प्रीतीची असीम उत्कटता आज त्याच्या प्रत्ययाला आली होती.

खडतर व्यवहारांतसुद्धा, उत्कट भावना एक प्रकारचा विरंगुळा आणून दिलासा निर्माण करूं शकते, हें तो नव्याने शिकला होता. निरतिशय भावनेचें साहाय्य असेल, तर संकटाचा कठोरपणा आणि दु:खाची तीव्रता पुष्कळच कमी होते, हें आता त्याला अनुभवाने चांगलें कळून चुकलें होतें. आपल्या धकाधकीच्या, कष्टमय, व अंध:कारानें बुजबुजलेल्या आयुष्यांत, गुलाबबाईच्या हृदयांत तेवत असलेली निस्सीम प्रीति नक्की प्रकाश पाडील, – अशी रास्त आशा हल्ली अशोकच्या मनांत डोकावूं लागली होती.

* * *

# ७

प्रकृति खडखडीत होऊन मधु शाळेंत जायला लागल्याला जवळजवळ महिना झाला होता.

मधूला नेण्या–आणण्यासाठी अशोकच्याहि शाळेमध्ये वारंवार फेऱ्या होऊं लागल्या होत्या.

असाच एक दिवस संध्याकाळीं अशोक मधूला आणण्याकरिता शाळेमध्ये गेला होता. शाळा सुटायला अवकाश असल्यामुळे मेंदीच्या बनांत जाऊन तो आपल्या लाडक्या मुलाची वाट पहात बसला होता. हा त्याचा नेहमीचाच कार्यक्रम झालेला होता. दररोज सायंकाळचा तो असा मेंदीच्या झुडपांखालीं जाऊन बसला की गुलाबबाई मुलांना परवचा सांगतां सांगतां अनेक

वेळा खिडकींमध्ये येऊन त्याचें दर्शन घेऊन जायच्या, त्या वेळीं त्या दोघांची नजरानजर व्हायची. परंतु आज मधूच्या बाई एकदाहि खिडकींत फिरकल्या नाहीत, — हें पाहून त्याला कसेंसेंच वाटलें. आज सकाळींदेखील रोजच्याप्रमाणे त्या त्याला भेटल्या नाहींत आणि त्याच्याशीं बोलल्या नाहींत, — हें आठवलें तेव्हा तो सचिंत झाला. त्या सचिंत अवस्थेंत असतांनाच शाळा सुटली, आणि मधु त्याच्याकडे दुडदुड धावत आला. मधूला एकट्याला पाहून पुन्हा त्याच्या मनाला खटकलें. कारण दररोज शाळेची घंटा होऊन मुलांचा लोंढा गेल्यानंतर गुलाबबाई मधूच्या इवलाल्या हाताला धरून, मंदीमध्ये त्याच्याकडे येत असत. आज सबंध दिवसांत त्या दिसल्या नसल्याकारणाने त्याला चुकल्याचुकल्यासारखें वाटलें. त्यासंबंधी मधुबाळाला कांहीं माहीत असल्यास पहावें म्हणून तो बोलणार — इतक्यांत मधूच उतावळेपणाने त्याला म्हणाला.

"बाबा, बाबा,—आमच्या वर्गांतलीं सगळीं मुलं किनई म्हणत होतीं की, आपल्या बाई आहेत ना — त्या खूप उंच झाडावरून खालीं पडल्या. त्यांना खूप खूप लागलंय! — आज त्या शाळेंतदेखील नाहीं आल्या."

मधूच्या तोंडचे बोल ऐकून अशोकची चिंता वाढली. खरा प्रकार काय आहे तो समजावा, म्हणून तो शाळेच्या कचेरीकडे जाऊं लागला; तोंच रंगू मोलकरीण सोप्याच्या पायऱ्या उतरून झपझप पुढे आली आणि म्हणाली,

"अवो साएब, गुलाबबाईनं कनी मदुबाळाला बोलावलंया. त्येना लई लागलंया. अक्षी निजून हैती—"

"काय झालंय त्यांना ?— मधु सांगतोय की, त्या झाडावरून पडल्या —"

"व्हय. लई उचावरून पडल्यात. काल कंच्या काय नु – जंगलांत गेल्या व्हत्या सगळ्या मास्तरनी टिपला. ततं उच झाडावरनं पडल्या खाली. पाठ मायंदाळ हडकून गेलिया. मांडीचं हाड बी मोडलंय जनु. आता माप दिस त्येस्नी साळं-मंदी याया नाय घावायचं. तवा त्येनी मदुबाळाला भेटाया बोलावलंया. त्येला संगती धिऊन ये म्हूनशान् मलाच सांगितलंया. आताच न्हिऊ का त्येला ?"

"नको नको, त्याला भूक लागली असेल आता. नंतर मी पाठवीन त्याला." जातां जातां त्यानें रंगूपाशी चौकशी केली, "गुलाबबाई घरींच आहेत ना ? का दवाखान्यांत—"

"न्हवं, घरलाच हैती."

अशोक मधूला घेऊन घाईघाईने घरीं आला. मधूचें खाऊन होईपर्यंत त्यानें गुलाबबाईसाठीं एक चिठ्ठी लिहिली. नंतर मधूचे मळलेले कपडे बदलून, त्याच्यासह तो गुलाबबाईकडे जायला निघाला. गुलाबबाई राहात असलेल्या बंगल्याच्या फाटका-पाशी आल्यानंतर उभा राहून तो मधूला हलकेच म्हणाला,

"बाळ, आपल्या बाईंची सगळी चौकशी कर हं. कुठून पडल्या, कशा पडल्या, किती लागलं – सारं सारं विचार हं त्यांना. औषधपाणी करायला सांग. जागच्या उठूं नका म्हणून त्यांना बजाव.—त्यांच्यावर खूप खूप प्रेम कर हं........आणि एवढी चिठ्ठी दे त्यांना. विसरूं नकोस हं." चिठ्ठीची घडी मधूच्या छातीवरल्या खिशांत ठेवींत अशोकने त्याला बजावलें, "घरीं

परत येतांना बाईंच्या गड्याबरोबर ये. एकटा बाहेर पडूं नकोस, बरं का--".

अशोकने उघडून दिलेल्या फाटकांतून मधू आंत शिरला आणि बंगल्यामध्ये गेला.

मधूला पाहून गुलाबबाईंना आनंद व दुःख झालें.

मधुबाळ भेटल्याचा त्यांना आनंद झाला. परंतु तो एकटाच आला हें पाहून त्यांना दुःख झालें. त्यांना अतिशय वाईट वाटलें. त्यांचा विरस झाला. आपल्याला अपघात झाला हें कळल्यावरं अशोक नक्की भेटायला येतील अशी दृढ आशा त्यांना वाटत होती. परंतु त्या आशेची निराशा झाली होती !

स्वतःची झालेली निराशा झाकीत, बाईंनी मधूला जवळ ओढलें. निजल्या निजल्याच त्यांनी त्याला कुरवाळलें, आणि आपल्यापाशी बिछान्यावर बसवून घेतलें. मधूने आपल्या बालिश भाषेंत, त्यांना कुठे कुठे लागलें ह्याची विचारपूस केली, तेव्हा बाईंना त्याचें मोठें कौतुक वाटलें. कोपराचें हाड निखळल्यामुळे भली मोठी मलमपट्टी करून त्याचा डावा हात बांधून ठेवला होता. तो पाहून मधूला रडायलाच आलें. त्याने पटकन् बाईंच्या गळ्याला मिठी मारली. गुलाबबाईंनी त्याच्या पाझरणाऱ्या डोळ्यांचे पटापट मुके घेतले. नंतर आपल्या भव्य छातीवर त्याचें तोंड दाबीत, त्यांनी त्याच्या बालमनाची समजूत घातली.

इकडचें तिकडचें पुष्कळ बोलून झाल्यावर बाईंनी हळूच त्याला विचारलें,

" मधुबाळ, एकटाच आलास? बाबांना नाहीं आणलंस तुझ्याबरोबर ? "

" आणलं होतं की,--मला फाटकांत सोडलं अन् ते परत गेले.—पण हो ऽ ऽ ! विसरलोंच मी. बाबांनी तुम्हांला बायला पत्र दिलंय."

आपल्या चिमुकल्या हाताने सदऱ्याच्या खिशांतील चिठ्ठी काढून मधूने ती गुलाबबाईंना दिली. बाईंनी मोठ्या उत्कंठेने घडी उलगडली. त्या अधीरतेने वाचूं लागल्या,—

" **गुलाबबाई,**

तुम्हांला अपघात झाला हें ऐकून वाईट वाटलं. झाडावरून कशा पडलांत हो ? खाली उतरून येण्याइतकाहि धीर नव्हता ? तुम्ही तर फार धीराच्या ! मग इतक्या कशासाठीं उतावीळ झालां होतांत - म्हणून एकदम खाली उडी घेतलीत ती ? -- फार लागलं आहे का ? जखमा गंभीर स्वरूपाच्या नाहीत ना ? काळजी घ्या. सगळे उपचार नीटपणे करा.

तुम्हांला भेटायला यावं असं मला वाटलं. पण तुम्हीं मधूला एकट्यालाच बोलावलंत मग मी कसा येऊं ? शिवाय माझ्यासारख्या तिऱ्हाईत, परक्या पुरुषानं आपणहून तुमच्या घरीं भेटायला येणं बरं का ? परत त्यांत तुम्ही पडलांत श्रीमंत—मी गरीब. श्रीमंताच्या घरीं न बोलावतां जाणारा गरीब भिकारीच. धनवानाच्या दारांत गरीब फक्त भीक मागायलाच जातो तेव्हा मी तुमच्या दारीं कसा येऊं ? माझ्या गुरूंनी मरतांना मला सांगितलं आहे, ' बेटा, चोरी कर, दरोडा घाल,–पण भीक मागूं नकोस ! कारण भीक म्हणजे आत्म्याचा अपमान,

स्वत्वाचा सर्वनाश, व्यक्तित्वाचा विनाश, आणि माणुसकीचा अधःपात होय. चौपदरी म्हणजे अभिमानाचं शिंकाळं-- हें कदापि विसरूं नकोस ! '

कुठल्या कुठं वाहवलों – नाही मी !

क्षमा करा !

जातों !

**अशोक महाजन.''**

पत्र वाचून झाल्यावर गुलाबबाईंनीं आपले डोळे मिटले. मिटलेल्या डोळ्यांपुढे उभ्या राहिलेल्या अशोकला जणुं त्या विचारीत होत्या, 'अशोक, माझ्याकडे यायला तुम्हांला बोलावणं पाहिजे ! केवढी आत्मनिष्ठा ही ! पण तो गर्व नाही, अहंगंड नाही – हें मला चांगलं माहीत आहे. तुमच्या मनांत ह्या क्षणीं चालू असलेला झगडा मी ओळखूं शकतें. परस्पर वृत्तींचं द्वंद्व – आणि भिन्न भावनांची रस्सीखेंच आता तुमच्या अंतरंगांत सुरू आहे,–हें इथं पलंगावर पडल्या पडल्या मला दिसतं आहे. तें द्वंद्व मी थांबवतें. त्या मानसिक झगड्यांतून आता मी तुमची सुटका करतें, थांबा--!'

शेजारच्या खोलींत 'टाइम्स ऑफ इंडिया' वाचीत असलेल्या आपल्या वडिलांना गुलाबबाईंनी हाक मारली,

"बाबा, जरा इकडे या ना.—"

"आलों हं बाळ !" आपल्या एकुलत्या एका आजारी मुलीला कांही तरी त्रास होतो आहे ह्या कल्पनेने सर गोपीनाथ घाईघाईने तिच्या बिछान्यापाशी आले. गादीवर बसून मुलीच्या

केसांवरून हळुवारपणे हात फिरवीत त्यांनी मृदु आवाजांत विचारलें,—

" गुलाब, कांही होतंय तुला ?—बाळ ? "

" बाबा, माझं एक काम कराल का ? – का तुमचीहि पुरुषी वृत्ति आड येणार आहे ?—इथून तिथून सगळे पुरुष सारखेच ! मग तो बाप असो, मुलगा असो, अथवा मित्र असो. सगळ्यांची वृत्ति एकसारखी—! "

" काय झालं बाळ ? कसली वृत्ति ?—काय बोलते आहेस तूं ?—कसलं काम आहे तुझं ? "

" आत्ताचे आत्ता कपडे करायचे आणि जायचं.—"

" कुठं ? "

" हा मधुबाळ आहे ना, ह्याच्या घरीं."

" कशाला ? "

" ह्याच्या वडिलांना भेटायला."

" कशासाठी ? "

" त्यांना आपल्या घरीं बोलवायला.—बाबा, खरंच – एवढं काम कराल का माझं ? कराच गडे ! माझ्या गळ्याची शपथ आहे तुम्हांला !—बाबा, वाटेल तें करून त्यांना आपल्याकडे घेऊन या. मधु आपल्याकडे इतके वेळा येतो, पण ते एकदा तरी फिरकलेत का ? आज तर त्यांनी कळस केला. अगदी फाटकापर्यंत येऊन ते घरांत आले नाहींत. ते फार मानी आहेत,—आणि लाजरे पण. ते एक मोठे चित्रकार आहेत, बाबा. तुम्हांला मुळीसुद्धा कमीपणा वाटायला नको त्यांच्याकडे जाण्यांत. गरीब नसते तर आहेत ह्याच्या-

पेक्षाहि मोठे कलावंत झाले असते ते. पण गरीबी त्यांचं पाऊल पुढं पडूं देत नाही. मधूच्या आजाराच्या निमित्तानं मी त्याना जवळून पाहिलंय. ते जितके हुषार आहेत तितकेच अभिमानी आहेत.—पण त्यांच्या ठायीं गर्व अजिबात नाही. गरीब कलावंतांमध्ये सरास आढळून येणारी अहंपणाची एकाकी वृत्ति मात्र त्यांच्यामध्ये पुष्कळ आहे. पण तो त्यांचा दोष नाही – परिस्थितीचा आहे. दारिद्र्यांत पिचत पडलेल्या सगळ्याच कलावंतांमध्ये तो असामान्य अवगुण थोड्याफार प्रमाणांत सापडतो.—बाबा, चाळीमध्ये एकाच खोलींत ते राहतात, म्हणून त्यांच्याकडे जायला तुम्हांला अवघड वाटायला नको. ते फार मोठे कलावंत चित्रकार आहेत. पण आजच्या जगाला कलेची किंमत राहिलेली नाही. तें फक्त पैसाच ओळखतं ! त्याच्याजवळ असलेल्या पैशावरच माणसाचा मोठेपणा ठरतो. पैसा हीच आज मोठेपणा मोजण्याची फूटपट्टी होऊन बसली आहे. अशा कठीण काळांत, त्यांच्यासारखे गरीब कलावंत स्वाभिमानानं जगताहेत हाच त्यांचा मोठा पराक्रम आहे!........बाबा, ते पराक्रमी आहेत. पैसा असता तर तुमच्याइतकेच ते मोठे झाले असते. त्यांच्या गरीबीला हिणवून – त्यांच्याकडे जायचं टाळूं नका, बाबा !––"

" गुलाब – बाळ, लहानपणीं मींसुद्धा कमिटीच्या कंदिलाखाली बसून अभ्यास केलाय हें तूं विसरलीस वाटतं ? केवळ दरिद्री म्हणून आजपर्यंत मीं कुणाचाच अवमान किंवा अपमान केलेला नाहीं ! त्यांत मधूचे वडील तर मोठे कलावंत आहेत ! ––मला त्यांच्या चाळींतल्या खोलीवर जायला मुळीच कमीपणा वाटणार नाही ! उलट एका चित्रकाराची ओळख होणार म्हणून मला भूषणच वाटेल ! हा मी आतांच निघालों पहा."

ताबडतोब सरसाहेबांनीं शोफरला गाडी तबेल्यांतून बाहेर काढायला सांगितली.

गुलाबकडून अशोकचा सविस्तर पत्ता घेऊन ते लगेच खालीं उतरले, आणि गाडींत जाऊन बसले.

अर्ध्याच तासांत सरसाहेबांची रुबाबदार 'क्रायस्लर' गाडी बंगल्याच्या आवारामध्ये पुन्हा येऊन उभी राहिली. शोफरने पटकन् येऊन मागचें दार उघडलें. सर गोपीनाथ शहाणे बाहेर आले. त्यांच्या पाठोपाठ अशोक उतरला. त्याच्या खांद्यावर हात ठेवून सरसाहेब माडीवर गेले. गुलाबबाईच्या खोलींत पाऊल ठेवल्याबरोबर सर गोपीनाथ आपल्या लाडक्या कन्येला म्हणाले,

"हं, गुलाब, — हे तुझे चित्रकार अशोक महाजन! बरं का,—चित्रकारसाहेब, हिनं मघाशीं मला अगदी धारेवर धरलं होतं पहा! — तुम्ही संध्याकाळीं फाटकापर्यंत येऊन गेल्याचं कळलं तेव्हा तर हिनं अगदी हाय खाल्ली!"

"होय——?" अशोकच्या आवाजांत आश्चर्य दिसलें. गुलाब-बाईकडे बाजूच्या नजरेने पाहात त्यांच्या वडिलांना तो अदबीने म्हणाला, "नाही तरी,—बरं का सरसाहेब, ह्या तुमच्या कन्यका व्यवहाराकडे फार दुर्लक्ष करतात बुवा! भावनेची नसती मिजास संभाळतात! आणि शिवाय —" मध्ये गुलाबबाईचे डोळे मोठाले झाले, म्हणून तो पुढे बोलायचा थांबला. सर गोपीनाथांच्या हें लक्षांत आलें असावें. आपला सोनेरी काड्यांचा चष्मा सारखा करीत ते अशोकला म्हणाले,

"बरं, मी पलीकडच्या खोलींत आहें. जातांना मला हाक मारा पाहिजे तर."

... १२ ...

सरसाहेब निघून गेल्यानंतर, गुलाबबाईंनी मुद्दामच पलंगाला अगदी चिकटून ठेवलेल्या देवदारी खुर्चीवर अशोक बसला. त्याने बाईंना झालेल्या अपघाताची विस्ताराने विचारपूस केली. त्यांना बसलेला मुका मार व झालेल्या जखमा त्याने आपल्या हाताच्या हळुवार स्पर्शाने बारकाईने, काळजीपूर्वक पाहिल्या.

अशोकच्या आवाजांतील आपुलकी आणि नजरेंतील जिव्हाळा पाहून — गुलाबबाईच्या आसुसलेल्या मनाला समाधान वाटलें. त्यांचा साडेतीन हातांचा देह काल जखमी झाला होता, परंतु त्यांचें इवलेंसें मन — किती तरी दिवस झाले — जखमांनी जर्जर होऊन पडलें होतें. अशोकची भीतियुक्त मधुर वाणी, — आणि त्याचा रम्य — मोहक स्पर्श — ह्यांच्या शान्त——शीतल शिडकाव्याने त्यांच्या रक्ताळलेल्या जखमी मनाला अलौकिक सुख झालें.

ज्याच्यावरून आपला जीव ओवाळून टाकायचें त्यांनी ठरविलें होतें, — त्या अशोकचा पहिला नाजुक स्पर्श आज गुलाबबाईंना अनुभवायला मिळाला होता! त्या पहिल्या मादक——रमणीय स्पर्शातील माधुरी त्यांना अमृतासारखी अवीट वाटली! दंवबिंदूच्या ओलाव्याने कळी उमलावी —तसें त्यांचें कोमेजलेलें मन त्या अमृतमय स्पर्शाने प्रफुल्लित झालें. अपघाताने जायबंदी झालेल्या त्यांच्या शरीरातूनसुद्धा एक प्रकारचें नवीन चैतन्य खेळूं लागलें!

इतका वेळ ओणवा होऊन,—गुलाबबाईंच्या जखमा पहात असलेला अशोक पाठीमागे खुर्चीवर टेकला. सहज त्याची नजर चहुकडे फिरली. पांढरा शुभ्र बिछाना, त्यावर आजाराने

पहुडलेल्या मधूच्या बाई, त्यांच्या अंगावरील लहानमोठ्या जखमांना केलेली मलमपट्टी, प्लास्टरमध्ये बांधून ठेवलेला त्यांचा डावा हात, जवळच्या स्टुलावर असलेल्या औषधांच्या बाटल्या, मलमांच्या बरण्या, आणि पांढरीं बँडेजें – हें सगळें पाहून त्याला मधूचा विषमज्वर आठवला. गुलाबबाईच्या ठिकाणीं बिछान्यावर त्याला तापाने फणफणलेला मधुबाळ दिसूं लागला. मधूच्या अवतीभोवती बसून अहोरात्र त्याची शुश्रूषा करणाऱ्या गुलाब-बाई त्याच्या नजरेसमोर उभ्या राहिल्या. मधु आजारी असतांना त्यांनी केलेली खडतर सेवा, – आणि त्याच्यासाठी घेतलेले जिवापाड परिश्रम त्याला आठवले. तेव्हा तो स्वतःच्या मनाशीच म्हणाला 'त्या कष्टमय सेवेची अन् शुश्रूषेची परतफेड मला करायलाच पाहिजे. हाच तो क्षण आहे. अंथरुणाला खिळलेल्या गुलाबबाईंची शुश्रूषा करून, अंशतः तरी त्यांच्या ऋणांतून मुक्त होण्याची नामी संधि चालून आलेली आहे. त्यांच्या प्रणयी भावनेला भिऊन माझं कर्तव्य मी विसरतां कामा नये ! मधूच्या बाईंची सेवा करण्यांत कसलाहि कमीपणा नाही —'

सगळे खोटे शिष्टाचार बाजूला सारून अशोकने गुलाब-बाईंची मनोभावें शुश्रूषा केली.

अशोकचा प्रिय, सुखकारक सहवास विपुलपणे मिळूं लागल्यामुळे गुलाबबाईंना स्वतःचा अपघाती आजार आशीर्वादा-सारखा वाटला.

औषधें व मलमपट्ट्या ह्यांच्यापेक्षा अशोकचा सुरम्य सहवास व संजीवनी-स्पर्श—ह्यांनीच गुलाबबाईंच्या जखमा लवकर बऱ्या झाल्या !

कोपराचें निखळलेलें हाड व्यवस्थित बसल्यावर त्यांचा बांधून ठेवलेला हात डॉक्टरांनी सोडला, तेव्हा मधु आनंदाने नाचूं लागला. तें पाहून गुलाबबाईंना अगदी भरून आलें. त्यांनी पटकन् मधूला उराशीं कवटाळलें. तें प्रेमनिर्भर दृश्य पाहून अशोकचें हृदय हेलावलें! त्याची भारलेली नजर चटकन् पाणावली.

मधु छातीशीं बिलगलेला असतांनाच गुलाबबाई अशोकजवळ आल्या, तेव्हा त्याला काय बोलावें हेंच सुचेना. बाईंनी त्याची गोंधळलेली मन:स्थिति ओळखली. स्वत:च्या कडेवर असलेल्या मधूला त्याच्यापाशी देत त्या हल्केच म्हणाल्या,

" न टळणारी गोष्ट माणसानं टाळूं नये. उलट ती शक्य तितक्या लवकर पूर्ण करण्याची दक्षता घ्यावी. तुमच्या—माझ्या जन्माची गांठ मधूने केव्हाच मारून टाकली आहे! – तिची तुम्ही दखल घेण्याचंच फक्त बाकी राहिलं आहे!— आयुष्याला मर्यादा असते! किती दिवस तुम्ही – स्वत:चं आणि माझं – दोन्ही मनं मारणार? दोन्हीहि मनांना एक-मेकांच्या साथीची आस लागून राहिली आहे! कधी पुरविणार ती तुम्ही, अशोक?–'

" गुलाबबाई —"

" मी मधूची बाई आहे! – तुमची नाही! माझं नांव ुलाब आहे! नुसतं गुलाब हाक मारा मला!"

" गुलाब, तुम्हीच आत्ता —"

" तुम्ही, अहो–जाहो म्हटलेलं मला आवडत नाही! मी तुमची वधू आहे! त्याच नात्यानं तुम्हीं मला हाक मारावी!"

“ —गुलाब, आज विचार काय आहे तुझा —?”

“ माझा विचार मीं केव्हाच लिहून कळविला आहे! आजहि तोच कायम आहे!”

“ मग झालं तर!”

“ काय? काय—मग झालं तर?”

“ आत्ताच तूं म्हणाली होतीस ना?—”

“ काय?”

“ की – न टळणारी गोष्ट माणसानं टाळूं नये.”

“ बरं, मग?”

“ तें विधान बरोबर नाही!”

“ कां?”

“ न टळणारी गोष्ट माणसानं टाळण्याचा प्रश्नच उद्भवत नाही!”

“ कसा बरं?”

“ कारण न टळणारी गोष्ट कांही केलं तरी टळतच नाही! आज ना उद्या ती घडतेच–आणि घडणारच!”

“ असं जर आहे, तर मग आजची गोष्ट उद्यांवर कां ढकला? ती आजच करून टाकावी!”

“ असं? मधुबाळ, तुझ्या बाई फारच चलाख आहेत रे!”

“ किंबहुना उद्यांची गोष्टसुद्धा आजच करण्याचा प्रयत्न करावा असं मी म्हणेन!”

“ तें मात्र तितकंसं सोपं नाही हं – बाईसाहेब! जवळ-जवळ अशक्यच आहे तें!”

“ कां बरं?”

... १६ ...

" कारण तूं निसर्गाचा कायदाच बदलतेस ! "

" तो कसा काय ? "

" मला असं सांगा,–नाही सांग, आधी संभव का आधी निर्मिति ? तुमच्या – तुझ्या म्हणण्याप्रमाणं निर्मिति आजच व्हायला पाहिजे. म्हणजे संभव व निर्मिति दोन्हीहि एकाच दिवशीं ! तें कसं शक्य आहे ? आता तुम्ही – नव्हे तूंच सांग, —संभव झाल्याशिवाय निर्मिति होईल का ? "

" चला ! चावट आहांत तुम्ही ! ! "

गुलाबबाईंची नजर पटकन् खाली गेली. त्या एकदम लाजल्या. त्यांच्या गोऱ्या गालांवर लाली पसरली. यौवनांतील रमणीय लज्जा त्यांच्या मोहक चेहऱ्यावर विलसूं लागली !

तें मनोहर दृश्य चित्रकाराच्या रसिकतेने बघत अशोक किती तरी वेळ उभा राहिला !

* * *



रात्रीं साडेआठ वाजतां जेवण झाल्यावर गुलाबबाई स्वतः च्या अभ्यासिकेंत आल्या. टेबलावर पडलेली 'अनाथ विद्यार्थी गृहा 'ची रोजनिशी हातांत घेऊन त्या ती सहजपणे चाळूं लागल्या. डाव्या हाताचा अंगठा व त्याशेजारील बोट ह्यांच्या चिमटींत सारीं पानें धरून त्यांनी ती झर्रदिशीं उलटलीं. पुन्हा एकदा तीं पानें तशींच फडफडवींत असतांना त्यांची नजर एका पृष्ठावर खिळली. त्यावर लिहिलें होतें,—

'भारतीय चित्रकला प्रदर्शनांतील चढाओढीचा निकाल.'

पटकन् त्यांनी पृष्ठाच्या शिरोभागीं पाहिलें.

'दिनांक १८ एप्रिल १९×× ........ पौर्णिमा.'

योगायोगाने तो आजचाच दिवस होता.

त्या लगबगीने खुर्चीवरून उठल्या. बैठकीच्या खोलींत जाऊन त्यांनी टेलिफोन डायरेक्टरींत नंबर शोधला. तो नंबर फिरवून त्यांनी टेलिफोन कानाला लावला. नंबर गुंतलेला होता. दोन मिनिटें थांबून त्यांनी पुन्हा डायल केलें. विरुद्ध बाजूने आवाज आल्यावर त्यांनी पृच्छा केली,

" 'सूर्य' कचेरी ना ?"

"हो." दुसऱ्या बाजूनें उत्तर आलें.

"संपादकसाहेब आहेत का ?"

"कोणते ?"

"माधवराव शारंगपाणी."

"हो हो, थांबा हं."

'सूर्य' ह्या मराठी दैनिकाचे वृत्त-संपादक श्री. माधवराव शारंगपाणी आपल्या टेबलावरील टेलिफोनमधून बोलूं लागले. तेव्हा बाई म्हणाल्या,

"माधवकाका, मी गुलाब शहाणे बोलतेय."

"काय ग ? आज कुणीकडे आठवण झाली म्हाताऱ्याची ?"

"अहो, दिल्लीला तें 'भारतीय चित्रकला प्रदर्शन' भरलंय ना ? त्यामधील स्पर्धेचा निकाल आज संध्याकाळीं सहा वाजता लागणार होता. — तुमच्याकडे आलाय का तो ?"

"हो, — आत्ताच पी. टी. आय्. ची तार आली."

"कुठल्या चित्राला मिळालं पहिलं बक्षीस—'प्रजासत्ताक पदक ?"

" मुंबईचंच आहे चित्र ! "

" होय? कोणतं बरं ?—नांव काय त्याचं ? "

" 'दोन भिकारणी.'—चित्रकार, अशोक महाजन."

" असं ?—वा वा ! खूपच आनंदाची बातमी सांगितलीत तुम्हीं, काका —! "

" आनंदाची ? "

" हो हो !—आनंदाची ! "

" ती कशी काय बुवा ? "

" अहो माधवकाका, अशोक महाजन माझे मित्र आहेत. —अगदी जिव्हाळ्याचे ! मला त्यांच्याशी.....बरं,—काका मी जातें !—"

" अग, थांब थांब !—मला अभिनंदन तर करूं देशील तुझं ? "

" फार आभारी आहें तुमची, काका !—जातें मी ! "

टेलिफोन घाईघाईने खाली ठेवून गुलाबबाई धावतच खोलींत गेल्या. आता त्यांची धांदल उडाली. रेशमी उंची साडी सोडून, त्यांनी साधे- सुती हिरवेंगार पातळ परिधान केलें. सोन्याच्या बांगड्या मोत्यांची माळ, व हिऱ्याच्या कुड्या—हीं श्रीमंती आभरणें उतरवून, गरीबीचे साधेच - परंतु स्वतःचें नैसर्गिक सौन्दर्य वाढविणारे अलंकार त्यांनी आपल्या तारुण्याने मुसमुसलेल्या अंगावर चढविले. बाईंनी आपल्याच मनाने ताडून चांगलें स्मरणांत ठेवलें होतें की, अशोकना भरजरी वस्त्रें, उंची अलंकार, आणि इतर श्रीमंती साज - ह्यांचा तिटकारा आहे.

अमीरी वेषभूषेंत आपण असलों म्हणजे ते आपल्याशी तुटक वृत्तीने व परकेपणाने वागतात हें त्या विसरलेल्या नव्हत्या.

शक्य तितका साधा पण सुंदर पोषाख केल्यानंतर गुलाबबाईंनी वडिलांची परवानगी काढली. जिना उतरून खाली आल्यावर त्या झपझप रस्ता चालूं लागल्या. वेगाने अंतर काटीत असतांना त्यांच्या हर्षोत्फुल्ल मनाला सारखें वाटत होतें, ' कधी मी एकदा खोलीवर पोहोचतें, आणि अशोकना ही आनंदाची बातमी सांगतें ! '

चाळीच्या पायऱ्या चढून खोलीच्या दारापाशी आल्या, तेव्हा बाईंना खूप दम लागला होता. नेहमीपेक्षा जरा जोरानेच त्यांनी कडी वाजवली.

आंतून आवाज आला,

" कोण आहे ?— दार उघडंच आहे."

दरवाजा लोटून गुलाबबाई आंत आल्या.

अशोक आपल्या नवीन चित्राचा आराखडा तयार करण्यांत गर्क झाला होता. हर्षाने वेडावून गेलेल्या गुलाबबाई क्षणभर त्याच्याकडे पाहात स्तब्ध उभ्या राहिल्या. तुडुंब भरलेल्या मनांतील आनंद ओसंडूं लागला तशा त्या म्हणाल्या,—

"—अशोक, तुम्हांला पत्ताहि नाही ?—केवढा मोठा सन्मान तुमच्या घराची वाट चालून येत आहे !!—अशोक—"

" काय झालं,–गुलाब ?—कसला सन्मान ?–अन् ह्या वेळीं तूं इथं कशी ? " समोर असलेल्या भल्या मोठ्या चित्रफलकापासून बाजूला सरकत अशोकने विचारलें.

" अशोक,–तुमच्या ' दोन भिकारणी ' भाग्याच्या ! त्या तुमचं नशीब नक्की उमलविणार ! "

" कां ?—काय झालं ? "

" अहो, तुमच्या चित्राला पहिलं बक्षीस मिळालं ! सबंध हिंदुस्थानांत तें पहिलं ठरलं ! तुमच्या ' दोन भिकारणीं 'नी सर्वोच्च ' प्रजासत्ताक पदक ' पटकावलं !—"

" होय ?—" अशोक आश्चर्यानें ताड्कन् उठून उभा राहिला ! तशा गुलाबबाई पुढे होत म्हणाल्या,—

" तुमचं अभिनंदन करतें मी !— "

" पण तुला कसं कळलं हें ? "

" अहो, सगळयांच्या आधीं मला कळलं ! साऱ्या जगाला तुमच्या थोर सन्मानाची बातमी उद्यां सकाळीं समजणार !— मला ती मघाच कळली ! "

" उभ्या आयुष्यांत इतकी उत्तम बातमी आज प्रथमच मला ऐकायला मिळाली ! ––ही उत्तम बातमी आणल्याबद्दल तुझे आभार मानतों, गुलाब ! "

अशोकच्या गद्‌गद्‌लेल्या आवाजांत भावना कांठोकांठ भरलेली होती.

कमनशिबी माणसाचें नशीब कधी नव्हत उघडलें,–त्याला कधी नव्हत यश मिळालें,—म्हणजे त्याची मन:स्थिति मोठी विचित्र होते !

अशोकचें तसेंच झालें !

विरोधी परिस्थितींचे व अपयशाचे धक्के खाऊन खाऊन मूढ बनलेलें त्याचें मन एकाएकी उचंबळून आलें ! निराशेने

दडपून – गाडून टाकलेल्या त्याच्या अंतःकरणांतील भावना उसळी मारून आल्या ! उफाळून आलेल्या त्या भावनांच्या आवेगांत तो मधु झोपला होता तेथे गेला. खाली गादीवर बसत – त्याच्या सर्वांगावरून त्याने प्रेमभराने हात फिरविला. त्याचा निद्रिस्त चेहरा मृदुपणे कुरवाळून अशोकने मधूच्या दोन्ही गालांचे पटापट मुके घेतले !

संथपणे त्याने आपली मान वर केली, तेव्हा त्याचे दुःखी नेत्र तरारून आले होते.

भावनेच्या भरांत गुलाबबाईदेखील केव्हाच मधूजवळ– अशोकच्या शेजारीं येऊन बसल्या होत्या ! त्यांचा स्पर्श त्याच्या खांद्याला झाल्याबरोबर तो दचकला ! – त्याची गूढ समाधि भंगली. स्वतःला सावरल्यानंतर क्षणभराने तो म्हणाला,—

" गुलाब, आजचा दिवस सुंदर आहे ! आज अप्रतिम योगायोग जुळून आलेला आहे !—माझ्याबरोबर येतेस ? "

" कुठं ? "

" विक्रोळीच्या अरण्यांत. "

" कशाला ? "

" तें तिथं गेल्यावर समजेल. "

" पण—

गुलाबबाई अडखळलेल्या पाहून अशोकने चटकन् विचारलें, " कां ?—अशा रात्रींच्या वेळीं माझ्याबरोबर यायला भीति वाटते ? "

" इश्श ! – मधु आजारी असतांना रात्रीच्या रात्री ह्या खोलींत तुमच्याबरोबर घालविल्या आहेत म्हणून बरं !—कांहीं तरीच बोलायचं—! "

" नाही, तूं घोटाळलीस,–तेव्हा म्हटलं—"

" आत्ता तासाभरांत परत येतें – असं मी बाबांना सांगून आलेंय; तेव्हा ते उगीच काळजी करतील म्हणून मी घोटाळलें. —आपण असं करूं या,–जातांना वाटेंत कुठं तरी दुकानांत टेलिफोन करून मी बाबांना सांगतें. म्हणजे ते शान्तपणं झोपतील.—पण इतक्या लांब जायचं कसं ?"

" रेल्वेनं."

" परत यायची सोय ? कारण तोंपर्यंत खूप उशीर होईल. लोकल्स कदाचित् बंद होतील."

" मग राहिले अरण्यांतच !—आपले पूर्वज नव्हते का राहात जंगलांत ?"

" हो तर ! आणखी किती तरी गोष्टी ते करीत होते ! त्या सगळ्या आपण--" स्वतःचें वाक्य मुद्दामच अर्धवट ठेवून गुलाबबाई मिस्किलपणे हसल्या.

मधूला उठवून तयार केल्यानंतर त्याच्यासह तीं दोघें ट्रॅमने बोरीबंदर स्टेशनवर गेलीं. सुमारे अकरा वाजतां – ठाण्याला जाणाऱ्या लोकल गाडीने त्यांना विक्रोळी स्टेशनवर आणून सोडलें.

गाडी गेल्यानंतर अशोकमधील चित्रकाराने एकवार सगळीकडे नजर टाकली. स्टेशन लहानसेंच होतें. लांबलचक पसरलेला फरसबंदी प्लॅटफॉर्म ओसाड व भयाण वाटत होता. विजेच्या लखलखीत उजेडांत लोखंडी रूळ चकाकत होते रेल्वेचा अवजड कंदील पुढ्यांत ठेवून, मळकट निळ्या कपड्यांतील पेंगायला लागलेला पोर्टर दाराशी उभा होता.

पोर्टरच्या हातांत तिकिटें देऊन गुलाबबाई व मधु ह्यांच्यासह अशोक बाहेर पडला.

थोड्याच वेळांत, स्टेशनच्या जवळ असलेल्या टेकडीवरील दाट अरण्यांत तीं येऊन पोहोचलीं. थोडेंसें अंतर चालून गेल्यावर, एका भव्य आम्रवृक्षाखाली असलेल्या पांढऱ्या शुभ्र थडग्यापाशी येऊन अशोक थांबला.

त्याच्या पाठीमागे थबकत, गुलाबबाईनी त्या थडग्याकडे बारकाईने निरखून पाहिलें.

तें कोणा तरी ख्रिस्ती माणसाचें थडगें असावें. ऐसपैस, भव्य आणि श्रीमंती थाटांत तें बांधलेलें होतें. सुंदर कलाकुसर त्यावर कोरलेली होती. एका टोकाला मोठा दगडी क्रॉस उभा केलेला होता.

अशोकने आपल्या पायांतील चपला काढल्या; हातांतील पिशवीमधून फुलांचा पुडा व उदबत्त्या बाहेर काढून तो थडग्याच्या अगदी जवळ गेला आणि खाली बसला. फुलांचा बारीकसा हार त्या सफेत गुळगुळीत थडग्यावर वाहून, चारसहा उदबत्त्या त्याने पुढच्या बाजूला पेटवून ठेवल्या. पुड्यामध्ये शिल्लक राहिलेलीं रंगीबेरंगी फुलें आणि तुळशीचीं पानें थडग्यावर इतस्ततः पसरून झाल्यावर तो गुडघे टेकून बसला. हात जोडून त्याने आपले डोळे मिटले, आणि थडग्यामध्ये चिरनिद्रेत असलेल्या व्यक्तीची मनोभावें प्रार्थना केली.

शेवटी डोळे उघडून त्याने आपलें मस्तक थडग्यावर ठेवलें —आणि वंदन केलें.

नंतर अशोक तेथून उठला आणि गुलाबबाईकडे वळला.

ह्या स्थळीं आल्या क्षणापासून अशोकच्या साऱ्या हालचालीं-कडे गुलाबबाई स्तिमित नजरेने पहात होत्या. पौर्णिमेच्या प्रशान्त चांदण्याखाली नहात असलेल्या वृक्षराईंतील तें रमणीय सृष्टिसौन्दर्य पाहून आधीच त्या भारावून गेल्या होत्या. 'त्यांत अशोकच्या गूढ व भाविक वर्तनाची भर पडली. त्यामुळे त्या जास्तच आश्चर्यचकित झाल्या.

अशोक जवळ येतांच गुलाबबाईंनी अधीरतेने त्याला विचारलें,

" कुणाचं थडगं आहे हें ? "

" थडगं नाही,-समाधि.—माझ्या गुरूंची समाधि आहे ती—" इतका वेळ धारण केलेलें मौन मोडीत तो गंभीरपणे उद्गारला.

" कोण होते तुमचे गुरु ? नांव काय त्यांचं ? "

" त्यांचं नांव तूं ऐकलेलं नाहींस. जगाला ते अगदी अज्ञात होते,—व आहेत. पण म्हणून कांहीं त्यांचं मोठेपण कमी होत नाही. ते एक महापुरुष होते.—त्यांचं नांव बाबुकाका टिपर्णीस ! "

" कुठं राहात असत ते ? – त्यांचा व्यवसाय ?—"

" त्यांचा सारा इतिहास एका वाक्यांत त्या समाधीवर कोर-लेला आहे,-जाऊन वाच ! "

गुलाबबाईंनी पुढे होऊन पाहिलें. नक्षीदार अक्षरांत थडग्याच्या उभ्या भिंतीवर लिहिलें होतें,

" चुरगळलेलें फूल येथे हुंदके देत पडलें आहे ! "

तें विलक्षण करुण आणि गंभीर वाक्य वाचून गुलाबबाईंचें स्त्री-मन हळहळलें. त्यांना वाईट वाटलें दु:खित अंत:करणाने परंतु उत्कंठायुक्त आवाजांत त्यांनी चौकशी केली,

" असं कां लिहिलं, अशोक ? काय त्याचा अर्थ ? "

" ती फार करुण कहाणी आहे, गुलाब ! "

" हरकत नसेल तर सांगा ना मला ! "

" पराक्रमी पुरुषाचे पोवाडे गायला कसली आलीय हरकत !—माझे गुरु बाबुकाका टिपणीस हे अतिशय मोठे चित्रकार होते. त्यांची प्रतिभा जातिवंत. त्यांचं निरीक्षण जबर. मानवी मनाचा व देहाचा त्यांचा अभ्यास फार दांडगा. चित्रकला त्यांच्या रक्तांत नुसती वाहात होती. सरस्वतीने मरेपर्यंत त्यांच्या मस्तकावरील हात हालविला नाही. तिच्या आशीर्वादाने त्यांच्या कुंचल्यांतून एक एक चित्र असं सुंदर बाहेर पडलं आहे !—त्यांतलं एक जरी चित्र प्रसिद्ध झालं, – तरी जगांतील सगळे थोर चित्रकार त्यांच्यापुढं मानाचे मुजरे करतील ! त्यांना विनम्रपणं वंदन करतील !—पण त्यांचं एकहि चित्र बाजारी जगाला दिसणार नाही. तशी त्यांची आज्ञा आहे. जिवंतपणीं एकदा ते म्हणाले होते, ' माझीं चित्रं पाहण्याची जगाची लायकी नाही ! हालहाल होऊन माझ्या आयुष्याचा चोळामोळा झालेला पाहण्यांतच त्याची योग्यता दिसून आली ! '—आणि अशीं श्रेष्ठ, सुंदर चित्रंसुद्धा बाबुकाकांना आयुष्य संपतां संपतां काढायला मिळालीं. त्यांचं सगळं आयुष्य दारिद्र्याशीं झगडण्यांत गेलं. एवढी मोठी कला अंगांत,–पण त्या दुर्दैवी पुरुषाला रंग, कुंचले वगैरे साहित्य घ्यायलादेखील

पैसे नसत. कधींकाळीं साहित्य मिळालं तर वेळ नसायचा. सारा वेळ भाकरीसाठीं काबाडकष्ट करण्यांत जायचा. भाकरीच्या ह्या प्रखर चिंतेंत आणि झगड्यांत सगळं तारुण्य गेलं. म्हातारपण आलं. मरायचा समय जवळ येऊन ठेपला, तरीं आपण कलेची सेवा करूं शकत नाहीं ह्याची त्यांना चीड आली. दु:खहि झालं. ते अतिशय वैतागले. त्या वैतागाच्या भरांत त्यांनी धर्मान्तर केलं. हिंदु होते ते खिस्ती झाले. 'अमेरिकन मिशन' ह्या खिश्चन संस्थेनं धर्मान्तर केल्यावर त्यांना आर्थिक मदत केली म्हातारपणीं का होईना, पण गरीबीमुळं अस्थिर बनलेल्या त्यांच्या आयुष्यांत स्थिरता आली. जीवनाला शाश्वती मिळाली. मध्यान्हाची काळजी मिटल्यावर बाबुकाकांनी रात्रंदिवस बसून चित्रं काढलीं. एकांपेक्षा एक सरस चित्रं चितारलीं. त्यांच्या कलेची तृप्ति झाली. त्यांनी हिंदुत्वाचा त्याग करून खिस्ती धर्म स्वीकारला, पण तो निव्वळ व्यवहारासाठीं ! जगांतील कोणत्याहि धर्मावर त्यांचा विश्वास नव्हता. धर्मान्तर करण्याचा निश्चय झाल्यावर, एका सनातनी पंडित मित्रानं त्यांचं मन वळविण्याचा प्रयत्न केला. तेव्हा बाबुकाकांनीं त्याला बजावलं, 'माझ्या अंगांत वसत असलेल्या निसर्गदत्त कलागुणाचं ज्या धर्मांत चीज होत नाहीं त्याला धर्म कसं म्हणायचं ? आणि असल्या निष्क्रिय, पांगळ्या धर्मांत अर्थ तरी काय ?'—मरतांना त्यांनी मला जवळ बोलावलं, आणि शेवटचा संदेश दिला,–' बेटा अशोक, कला हाच कलावंताचा खरा धर्म. इतर कोणत्याहि धर्माची तमा बाळगून कलावंतानं आपल्या आयुष्याची नासाडी करून घेऊं नये. धर्म धर्म म्हणून ज्याची ओरड करतात तो धर्म केवळ सुखवस्तु लोकांसाठीं असतो. त्यांनींच तो निर्माण केलेला असतो. आणि

फक्त त्यांनाच त्याचा फायदा मिळतो. इतरांना नाही. धर्म गरीबांसाठी नाही. त्यांना तो सुखी करूं शकत नाही. ह्याचा पुरावाच पाहिजे असेल तर — कारकून, मास्तर ह्यांनी भरलेल्या मध्यमवर्गाकडे पहा. सारा पांढरपेशा समाज आज उपासमारीनं मरत आहे, –दु:खानं गांजून गेला आहे ! वास्तविक मध्यमवर्गच आज सुखी असायला पाहिजे होता. कारण आजच्या अधर्मी, अनीतिमान काळामध्ये फक्त तोच वर्ग काय तो धर्मानुसार चाललेला आहे. पण —पण त्याच्या ह्या घोर अपराधामुळंच तो आज पिचत पडला आहे. खालचा अडाणी वर्ग आणि वरचा श्रीमंत वर्ग ह्यांच्याकडे बघ. ते धर्मबिर्म कांही जाणत नाहीत; आणि म्हणूनच ते आज इतक्या सुखानं जगताहेत. पैसा हाच त्यांचा धर्म असतो. आणि फक्त त्याचंच ते पालन करतात ! अशोक, तुला हें सगळं सांगायचं कारण — तूं माझ्यासारखाच दरिद्री आहेस. वर सांगितलेलं सत्य समजण्यासाठी, माझ्याप्रमाणं सारं आयुष्य खर्ची पडूं देऊं नकोस. भावनेच्या आहारी कधीहि जाऊं नकोस. सदोदित व्यवहार पहा. अष्टौप्रहर त्याच्यावर पाळत ठेव.'

जिवंतपणीं साडेतीन रुपये भाड्याच्या खोलींतसुद्धा बाबुकाकांना कधी स्थिरतेने राहायला मिळालें नाही. पण ते वारल्यावर, कॅथॉलिक चर्चने त्यांच्या इच्छेनुसार हा जमिनीचा तुकडा सरकारकडून साडेतीन हजार रुपयांना खरेदी केला, आणि त्यावर हें थडगं—हीं समाधि बांधली !

बाबुकाकांना ही जागा फार आवडायची. दर पौर्णिमेला ह्या स्थळीं येऊन चांदण्यांत मनमुराद गप्पा मारण्याचं आम्हां

दोघांनाहि फार वेड होतं.—आणि विचित्र योगायोग म्हणजे नेमकं पौर्णिमेच्या दिवशींच बाबुकाकांचं देहावसान झालं. बरोबर तीन वर्षांपूर्वीं ह्याच सुमाराला त्यांनी चिरनिद्रेसाठी ह्या थडग्यामध्ये प्रवेश केला.

समाधीवर कोरलेल्या त्या हृदयस्पर्शी वाक्याच्या पाठीमागे अशी करुण कहाणी आहे !

माझ्या गुरूचं चरित्र असं शोकरसानं थबथबलेलं आहे !

ह्या निसर्गरम्य स्थळाचा इतिहास असा रोमांचकारी, पवित्र, आणि मधुर आहे !

प्रत्येक पौर्णिमेला इथं येऊन बाबुकाकांच्या ह्या समाधीची मी पूज्यभावानं पूजा करतों; आणि पुनवेच्या प्रसन्न चांदण्यांतील चार क्षण त्यांच्या सहवासांत काढतों.

आजचा समय अनेक दृष्टींनी अपूर्व आहे.

नेमकं पौर्णिमेच्या दिवशींच माझ्या कलेला मोठं बक्षीस मिळावं, – ह्या योगायोगाला तर उपमाच नाही !

आज, ह्या प्रिय स्थळीं, अशा संस्मरणीय प्रसंगीं, तुझा व मधूचा सहवास लाभणं—हाहि अलभ्यच लाभ म्हटला पाहिजे ! ''

अशोक बोलायचा थांबल्यावर गुलाबबाई जागच्या उठल्या. जवळच डंवरलेल्या रानवेलीपाशीं जाऊन त्यांनी तिच्यावरील चार फुलें तोडलीं. पायांतल्या चपला काढून त्या बाबुकाका टिपणिसांच्या थडग्याजवळ गेल्या. हातांतील पिवळींधमक रानफुलें थडग्यावर वाहून, त्यांनी अशोकच्या परमपूज्य गुरुजींना आदरभावाने नमस्कार केला !

गुलाबबाईंच्या सांगण्यावरून लहानग्या मधूनेहि थडग्यावर आपलें मस्तक टेकलें.

नंतर तीं तिघें जणें आजूबाजूचा रम्य प्रदेश पाहण्याकरिता उठलीं.

विक्रोळीच्या अरण्यांतील ती चांदण्यांतील सहल गुलाब-बाईंना अतिशय मोहक वाटली.

फिरत फिरत तीं एका छोट्याशा सरोवराच्या कांठीं आलीं. पाणी पाहून मधुबाळ नाचूं लागला. तें बघून अशोक व गुलाब-बाई ह्यांनी तेथेच जलाशयाच्या तीरावर कांही वेळ बसायचें ठरविलें.

गुलाबबाई व मधु ह्यांना कातळाच्या तोंडीवर बसवून अशोक तळ्यामध्ये उतरला. अगदी काठाला पाण्यामध्ये उमललेलीं दोन-तीन चंद्रकमळें त्याने तोडलीं, आणि मधूच्या हातांत आणून दिलीं. मधूच्या आनंदांत भर पडली. तो फुललेल्या चंद्रकमळांशीं खेळण्यांत दंग झाला. तेव्हा अशोक कातळावर गुलाब-बाईंच्या शेजारीं येऊन बसला. त्याने सहज सभोवार दृष्टि फेरवली. चहुबाजूंना असंख्य लहानमोठे वृक्ष स्तब्धपणे उभे होते. समोर पसरलेल्या सरोवराच्या सफेत पृष्ठभागावर लहान लहान लाटा नाजुक नृत्य करीत होत्या. आसमंतात् पुनवेचें शान्त व प्रसन्न चांदणें भरून राहिलें होतें. तें रमणीय दृश्य व सुरेख वातावरण बघून – अशोकमधील चित्रकार जागा झाला. कलावंताच्या कलात्मक नजरेने भोवतालचें मनोहर निसर्ग-सौन्दर्य न्याहाळून, तें तो आपल्या अंतर्मनाच्या गाभाऱ्यांत साठवूं लागला. सृष्टीचें तें वेड लावणारें कलासौन्दर्य निरखतां निरखतां

त्याच्या रसिक नेत्रांत अलौकिक आनंद अवतरला. अशोकच्या डोळयांतून डोकावणाऱ्या त्या आनंदाच्या पाठीमागे उन्माद लप-लेला आहे,—हें बघितल्यावर गुलाबबाईच्या मुखावर स्मित झळकलें ! त्यांना – कां कुणास ठाऊक – एकदम हुरूप वाटूं लागला. त्या हुरूपामध्येच, पुढ्यांत खेळत बसलेल्या मधुबाळाच्या हातांतील एक कमळ घेऊन, त्याच्या पूर्णपणे विकस-लेल्या मऊमऊ पांढऱ्या शुभ्र पाकळ्यांशी त्या हळुवार हाताने चाळा करूं लागल्या. त्यांच्या गोऱ्यापान लांबसडक बोटांचीं लाल लाल बारीक अग्रें कमळाच्या त्या गोजिरवाण्या पाकळ्यांशी नाजुकपणे खेळत असलेलीं बघून, अशोकच्या कलावंत मनाला मोठें सुख झालें. तो खुद्‌कन् हसला;–तें पाहून गुलाबबाईंनी अशोकला सहज पृच्छा केली,—

“ कां हसलांत ? ”

“ उगीच ! ” त्यांचीं बोटें आणि कमळाच्या पाकळ्या ह्यांच्याकडे एकवार पाहात तो उत्तरला.

“ तरी —? ”

“ तो नाजुक खेळ पाहून ! ”

“ कसला ? ”

“ बोटं आणि पाकळ्या – ह्यांचा.”

“ चला !—कशी पाकळी न् पाकळी उमलली आहे, नाही ह्याची ? कसं डेरेदार फुललं आहे कमळ ! — नाही ? ”

“ हं ! ”

“ कशानं ? – माहीत आहे ?—”

" कशानं ? "

"—चंद्राच्या दर्शनानं ! " आकाशांतील पूर्णचंद्र आणि हातांतील कमळ ह्यांच्याकडे आळीपाळीने नजर टाकीत बाई बोलल्या, " ह्या कमळासारखंच स्त्रीचं आहे ! "

" तें कसं ? " अशोकच्या आवाजांत उत्कंठा दिसली.

" जसं हें कमळ विकसायला चंद्र लागतो, – तसं स्त्रीचं हृदयपुष्प उमलायला पुरुषाची जरूरी असते ! चंद्राच्या दर्शनानं ज्याप्रमाणं कमळ हसायला लागतं, – त्याप्रमाणंच पुरुषाच्या सहवासांत स्त्रीच्या साऱ्या भावना आणि सगळ्या शक्ति उसळून व उफाळून येतात ! रातकमळाला जसा चंद्र — तसा स्त्रीला तिचा पुरुष ! "

" आणखी एका बाबतींत त्या दोघांचं साम्य आहे ! "

" कुठल्या ? "

संपूर्णपणे विकसलेलें कमळ गुलाबबाईच्या हातांतून घेऊन, तें त्यांच्या प्रफुल्लित मुखाजवळ धरीत अशोक म्हणाला,

" ह्या !– कवि म्हणतात तें कांहीं खोटं नाही ! स्त्रीचं मुख आणि कमळ ह्यांच्यांत खरोखरीच पुष्कळ साम्य आहे ! "

अशोकच्या ह्या प्रशंसेने गुलाबबाईचा आधीच प्रफुल्लित असलेला चेहरा जास्तच खुलला. कमळाच्या पाकळयांच्या नाजुक, शीतल स्पर्शाने त्यांच्या गालामध्ये गोड शिरशिरी आली ! स्वतःच्या डाव्या गालाशी कमळ धरलेला अशोकचा उजवा हात एकदम पकडून, – तो आपल्या गालावर दाबीत – त्यांनी लाजऱ्या आवाजांत म्हटलें,

" अशोक !— "

"– काय, गुलाब ?" आपला हात बाईच्या गालावर तसाच राहूं देत त्याने नाजुकपणें विचारलें.

" —मी कधी उमलणार ? ह्या कमळाप्रमाणं मला कधी उमलविणार ?—माझा चंद्र मला केव्हा फुलवणार !........ अशोक —" बाईंनी पटकन् त्याचा हात आपल्या उललेल्या ओठांवर दाबला,–आणि त्याचें गाढ चुंबन घेतलें ! नंतर त्याचा हात आपल्या मांडीवर घेत त्या त्याला म्हणाल्या, "अशोक, हा गुलाबाचा ताटवा अशोकाच्या झाडाखालीच फुलला पाहिजे ! फक्त तिथंच तो फुलू शकेल ! "

" ताटवा ? – का फूल ?" अशोकने गोड विचारणा केली.

" कांहीहि म्हणा ! मजबूत आसरा मिळाला की ताटवा फुलं धरील ! मग तीं फुलं अशोकपर्णांमध्ये वेष्टिलीं म्हणजे सुंदरसा गुच्छ तयार होईल ! ........ अशोक, हा गुलाब मी तुमच्या पायाशी वाहतें—" गुलाबबाई अशोकच्या पायापाशी जाऊन पडल्या. त्याच्या पावलांना आपल्या आसवांचा अभिषेक घालीत त्या आवेगाने पुटपुटल्या, "—त्याचा स्वीकार करा, अशोक !—नाही म्हणू नका – मधुबाळाची शपथ आहे तुम्हाला ! !—"

अशोकला हा प्रसंग अकल्पित होता. आजपर्यंत जगाच्या ठोकरा खाल्लेल्या त्याच्या पायाशी गुलाबबाईसारखी सौन्दर्यवती विदुषी पडलेली पाहून तो क्षणमात्र अगदी बावरून गेला. पण नंतर लगेच स्वत:ला सावरून त्याने गुलाबबाईंना आपल्या पायावरून उठविलें. आसवांनी डबडबलेले त्यांचे डोळे आपल्या

रुमालाने पुसून, त्यांच्या पाठीवरून भावनेचा हात फिरवीत, मोठ्या प्रयासाने त्याने त्यांचें सान्त्वन केलें.

भावनांचा आवेग ओसरल्यानंतर, स्वतःचे दोन्ही हात अशोकच्या पायांवर ठेवीत गुलाबबाई पुन्हा बोलूं लागल्या,—

" हें गुलाबाचं फूल अशोकाच्या बुंध्यापाशीच चांगलं शोभून दिसेल !—"

" गुलाब, चुकतेस तूं ! " बाईंचे हात आपल्या हातामध्ये घेऊन, खेळत खेळत दूर गेलेल्या मधूला त्याने हाक मारली, " मधुबाळ—अरे मधुबाळ— "

कमळाच्या पाकळ्या ओंजळींत घेऊन मधु दुडदुड धावत तेथे आला. तेव्हा अशोकने त्याला विचारलें,

" बाळ, फूल झाडाच्या बुंध्याला येतं का शेंड्याला ?— कुठं येतं.– सांग बरं ? "

" शेंड्याला ! " उंच उडी मारीत मधु उत्तरला, " उंच उंच – शेंड्याला ! "

अशोक व गुलाबबाई–दोघांनाहि त्याच्या उत्तराचें फार कौतुक वाटलें.

दोघेंहि जणें एकदम त्याच्याजवळ धावलीं.

दोघांनी पटापट त्याचे मुके घ्यायला सुरवात केली.

चिमणा मधु ह्या नवीन प्रकाराने भांबावून गेला.

तो चटकन् मागे सरकला.—

—त्याबरोबर अशोक व गुलाबबाई ह्यांचीं तोंडें अचानकपणे एकमेकांवर टेकलीं !

प्रथम क्षणीं दोघेंहि चपापलीं !

नंतर दोघांनाहि आनंद झाला !

गुलाबबाईंना तर स्वर्गाचें ओझरतें दर्शन झाल्यासारखें वाटलें !

मधु एकदम ओरडला—

" कशी गंमत झाली !— बाई – बाबांची कशी गंमत झाली !—गंमत झाली ! "

तो टाळ्या वाजवून जोरजोराने हसूं लागला. तेव्हा गुलाबबाई हलक्या आवाजांत अशोकला म्हणाल्या,

" उद्या शाळेंतल्या सवंगड्यांना ही गंमत त्याने सांगितली नाही म्हणजे मिळवली ! "

" कां बरं ? अशी भीति कां वाटते ?—ह्यालाच मी ढोंग म्हणतों !—समजलं ? " अशोकने बाईंना खिजविलें.

" असं कां म्हणतां ? "

" नाही तर काय ? "

" ठीक आहे; तर मग— ' मधु – ए मधुबाळ —' " मधु जवळ आला तेव्हा त्या त्याला म्हणाल्या, " मधुबाळ, मघाशी किनई मी स्वर्गात गेलें होतें ! "

" स्वर्गा ऽ ऽ त ? म्हंजे कुठं ? " मधूने चौकशी केली.

" देवाच्या घरीं. "

" मग माझी आई भेटली तिथं ? "

" हो ऽ ऽ ! त्यांनी निरोप पण सांगितलाय तुला. त्यांना

किनई देव इकडं पाठवायला तयार नाही. तेव्हा त्यांनी मला सांगितलं, ' आता तुम्हीच मधूची आई व्हा.' तुझ्या आईच्या सांगण्याप्रमाणं आजपासून मी तुझी आई होणार आहे !– आवडेल का तुला ?"

" हो हो ! फार आवडेल !— बाबा, बाई माझ्या आई होणार ! तुमच्या कुऽऽठं ?" मधु आनंदाने उड्या मारूं लागला, तसें गुलाबबाईनी त्याला आपल्या जवळ ओढलें; त्याच्या हसऱ्या गालांचे खूप मुके घेत त्या त्याला म्हणाल्या,–

" मग उद्या शाळेंत गेल्याबरोबर सगळ्यांना सांगायचं— काय सांगशील ? की–' काल रात्रीं बाई माझ्या आई झाल्या ! गुलाबबाई माझ्या आई झाल्या— ' अगदी न विसरतां सगळ्यांना सांगायचं ! बरं का ? जा आता त्या कमळाशी खेळ —"

मधु निघून गेल्यानंतर गुलाबबाईनी विजयी मुद्रेने अशोककडे पाहिलें. त्याच्या अगदी जवळ सरकून, त्याच्या अंगाला त्या एकदम लगटल्या. त्याच्या भरदार छातीवर त्यांनी आपलें मस्तक टेकवलें. क्षणभराने – स्वतःची मान हलकेच वर उचलीत त्यांनी आपली तिरकी, चोरटी नजर त्याच्या चेहऱ्यावर टाकली. आपल्या दोन्ही हातांनी अशोकच्या अंगाभोवती घट्ट मिठी मारीत त्यांनी खट्याळपणे विचारलें,—

" —आता तर मी ढोंगी नाही ना ?"

प्रीतिसाफल्याचें समाधान गुलाबबाईच्या आवाजांत उमटलें होतें. प्रेमाची पूर्तता त्यांच्या दृष्टींत चमकत होती. आपल्या

प्रणयाची साङ्गता झाल्याचें त्यांच्या उत्फुल्ल चेहऱ्यावर ठळकपणे दिसत होतें.

प्रीतीचें साफल्य,–प्रेमाची झालेली पूर्तता,–आणि प्रणयाची होत असलेली साङ्गता, — ह्यांचें विलक्षण सुख ह्या क्षणाला त्या अनुभवीत होत्या.

गुलाबबाईच्या खट्याळपणाची अशोकला मोठी गंमत वाटली.

त्यांचें मुखकमल आपल्या दोन्ही हातांत धरून – अशोकने गुलाबबाईच्या आसुसलेल्या ओठांवर आपले ओठ टेकले !

* * *

# दत्ता वैद्य ह्यांची पुस्तकें.

मोगरीचा गजरा

हिरवळींतील कांटे

प्रीतीचा खेळ

---

**आगामी**

४२ च्या क्रान्तीवर आधारलेली एक करूण,

रम्य प्रणयकथा

हिरकणीवहिनी